


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्धारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्धारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्धारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

७१

संपादक— श्री. रामचंद्र श्रीपाद जोग

आषाढ १८६६

वर्ष १७ वें ] जुलै १९४४ [ अंक २ रा



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन—** अनाथ विद्यार्थिगृहाच्या विद्यमानें तीस पुस्तिकांच्या स्वाध्यायमालेचें प्रकाशन श्री. न. चिं. केळकर यांच्या हस्तें ता. ४ ऑगस्ट या दिवशीं झालें.

---

## अनिष्ट लेखन समालोचन समिति—तिसरी बैठक

१ रत्नप्रभा रणदिवे यांच्या संपादकत्वाखाली प्रसिद्ध होणाऱ्या 'रागिणी' मासिकाच्या 'गडकरी स्मृति प्रकाशन' या अंकाच्या मुखपृष्ठावरील चित्र प्रसिद्धीकरणाच्या दृष्टीनें सदभिरुचीस विघातक असल्यामुळे तें निषेधार्ह आहे असें या समितीचें मत आहे.

२ पुणें नाट्यनवरात्रांत करून दाखविलेल्या व श्रीमती शकुंतला परांजपे यांनी लिहिलेल्या 'पांघरलेली कातडीं' या नाटकांत कांही ठिकाणीं ग्राम्य शब्दयोजना केलेली आहे ती बरी नाही. या नाटकाच्या प्रयोगाच्या वेळीं तींत योग्य ती सुधारणा करावी.

३ 'द्रौपदी' या आगामी बोलपटाची जाहिरात देणारांनी जी भाषा योजलेली आहे ती अत्यंत अनिष्ट आणि किळसवाणी आहे असें या सभेचें मत आहे. या संबंधांत निर्मीड, नवयुग, नवा झंकार या पत्रांत अगदी वेळेवर व अनुयुक्त टीका आली आहे त्याबद्दल सदर पत्रकारांचे ही समिति आभार मानीत आहे.

४ नवा झंकार प्रकाशन 'अंजन' या पत्राचे ता. ६-२-४४, १३-२-४४, २०-२-४४, ११-६-४४ वगैरे अंकांत प्रा. ना. सी. व सौ. कमलाबाई फडके यांस अनुलक्षून जो वैयक्तिक स्वरूपाचा मजकूर प्रसिद्ध होत आहे तो अत्यंत गलिच्छ व हीन अभिरुचीचा द्योतक आहे. त्याबद्दल ही समिति सदर पत्राचा निषेध करीत आहे.

कृ. गो. मराठे
कार्यवाह,
अ. ले. स. समिति, पुणें

---


आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरितां रामचंद्र श्रीपाद जोग यांनी प्रसिद्ध केलें.



## प्रभात



स्वप्नमालिका सरे अता ही !
　　उधळित होता चन्द्र सुधेला,
　　रातराणिला बहार आला,
　　धुन्द करी तो गन्ध मनाला,
निशा अता ती विलुप्त होअी.

　　त्या सुंदर चंदेरी रातीं
　　सुखें पहुडतां शय्येवरती
　　निद्रामीलित नयनांपुढती
तरङ्गलीं स्वप्नें सुखदायी.

　　रजनीच्या बागेंत गोजिऱ्या
　　स्वप्नांच्या विकसल्या मंजिऱ्या,
　　अेकाहुनि चढ सुंदर साऱ्या
देखुनियां मन भुलुनी जाअी.

　　स्वप्नफुलांचा सुगंध पिअुनी,
　　जीव खुळा हा क्षणीं होअुनी,
　　भरंभर चढला नभोवितानीं;
स्मरण न त्यां जगताचें राही.

　　आणि तोंच–ही रजनी सरली,
　　क्षितिजावरती प्रभा पसरली,
　　नयनांपुढचीं स्वप्नें विरलीं;
लख्ख अुजळल्या दिशा दहाही.

　　सरलें स्वप्नांचें अनुरंजन,
　　निशा संपली ये आता दिन,
　　चराचरीं ओताया जीवन
तेजोभास्कर गगनीं येअी.

　　स्मृती परि स्वप्नांची ठेवुन
　　तयांत अपुलें रंगवुनी मन
　　आतप चण्डांशूचा दारुण
सुखें दिनभरी साहिन मीही !

—शान्ता ज० शेळके

# काव्य आणि गेयता

लेः— य. रे. आगाशे

रसवंतीची जन्मकथा हा प्रो. माटे यांचा सुंदर प्रबंध वाचल्यानंतर त्यांतील कांही मुद्दे चिंत्य वाटले. त्यांविषयी या लेखांत थोडी चर्चा केली आहे. यांतील विवेचन म्हणजे ग्रंथाचें परीक्षण किंवा समालोचन नव्हे. साहित्यमीमांसेची आवड याहून दुसरें कारण नाही. या प्रबंधामध्ये व्यासंगी मनुष्याच्या विचारांस चालना देणारीं जीं अनेक स्थलें आहेत व ज्यांमुळे तो मराठी साहित्यशास्त्रामध्ये महत्त्वाचा वाटतो त्यांविषयी कांही विचार नमूद केले आहेत.

सुरस गद्यहि रसात्मक असल्यामुळे काव्याचा अनन्यसाधारण धर्म कोणता हें पाहूं गेल्यास तो गेयता हाच होय. ही गेयता काव्याला स्वतंत्रपणें सुरसपणाची जोड करून देते. रसात्मकता हें काव्याचें मुख्य लक्षण मानण्याचें कारण नाही ही ग्रंथकाराची भूमिका वाचकांकरिता प्रथम स्पष्ट करून दाखविली आहे. नंतर तद्विषयक चिकित्सा केली आहे.

वाङ्मयप्रकार विविध आहेत. मुख्य असे दोन; गद्य आणि पद्य. पद्यरूप वाङ्मयप्रकाराचें म्हणजे काव्याचें 'अनन्य . साधारण' व्यावर्तक असें लक्षण सांगण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे. आतापर्यंत साहित्यशास्त्रकारांनी रसात्मकता हें काव्यलक्षण मानलें होतें. परंतु मुद्रणकला आल्यापासून सुरस गद्य अनेक प्रकारें लिहिलें जात असल्यामुळे रसात्मकत्व हें काव्याचे ठिकाणीं अनन्यभावाने वागत नाही. काव्यगत अनन्यसाधारण धर्म कोणता असें पाहूं लागल्यास गेयता हाच तो धर्म. साध्या शब्दपंक्तीलासुद्धा जी अत्यंत गोडी प्राप्त होते असें दिसून येतें ती गेयतेमुळे. कवीच्या भावनेला, विचाराला, कल्पनेला ती सुरसपणाची स्वतंत्र जोड देते इतकेंच नव्हे तर त्याच्या स्फूर्तीला सुद्धा ही गेयता सुंदर स्फुरण देते. संगीताचें सामर्थ्य अजून आपण पुरेसें ओळखलें नाही. वाक्यांत केवळ रस आहे एवढ्यांने श्रोता संतुष्ट होत नाही; त्याला संगीतमिश्र रस पाहिजे असतो. यावरून गेयता आणि संगीत यांचें काव्यांत असाधारण महत्त्व आहे. आधुनिक काव्यगायक गेयतेचाच आश्रय करतात. एरवींच्या काव्यापेक्षा नाटकांतील पद्येंच ज्याच्या त्याच्या तोंडीं जास्त होतात. गेयतेमुळे मूळची रसात्मकता तिप्पट वाढते. पदांच्या चालींवर काव्य करण्याची प्रवृत्ति आधुनिक काव्यांत झपाट्याने वाढत आहे. प्राचीन मराठी काव्यांतहि अमृतरायाने सभेला मोह पाडणारा असा सुंदर प्रकार शोधून काढला. त्याचें नांव कटाव. त्याचें कारण असें की त्यांत वृत्तबंधाच जाच कमी आणि गेयतेचें सौंदर्य पुरेपूर. आधुनिक मुक्तच्छंदांत या गेयतेची ओढाताण होत आहे. मुक्तच्छंदांत काव्याचें अस्तित्व पाहिजे असेल तर गेयता राहिलीच पाहिजे. सारांश, गेयतेचें ऋण कवींनी मान्य करावयास हवें. गेयतेने त्यांची प्रतिभाहि स्फुरण पावते आणि तिच्या भ्रमणाला गेयतेच्या अंगणामुळे सौकर्य प्राप्त होतें. गेयतेचा इतका निकट संबंध कविमनाशीं आहे. काव्य जरी सुरस असलें तरी तितक्याच सुरस गद्यापेक्षा त्याच्या पाशीं जास्त कांही शिल्लक राहणार नाही. म्हणून गेयता हीच मुख्य काव्यलक्षण मानावयास हवी ही लेखकाची भूमिका.

अनुक्रमणिका

गेयता हें अनन्यसाधारण काव्यलक्षण निश्चित करतांना लेखकाने काव्यलक्षणाच्या तर्कशुद्धतेकडे साक्षेपाने लक्ष्य दिलें आहे. कोणत्याहि वस्तूचें यथार्थ, शास्त्रीय ज्ञान हेंच नेहमी जिज्ञासूला अिष्ट असावें. आणि शास्त्रीय चिकित्सेमध्ये तर्काला महत्त्व द्यावयाचें नाही तर दुसऱ्या कोणत्या गोष्टीला? या दृष्टीने रसवंतीच्या जन्मकथेंतील गेयताविषयक तर्कप्रधान विचारसरणीला कोणताहि आक्षेप नसावा हें क्रमप्राप्त होय. परंतु एकंदर विवेचनांतील शास्त्रीयता मान्य करूनहि प्रस्तुत काव्यलक्षणामुळे काव्यस्वरूपाचें यथावत् दर्शन होत नाही असें वाटतें तें कां याविषयीं थोडा विचार करणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणे पूर्वोक्त भूमिकेमध्ये गेयतेचें जें स्वरूप सांगितलें आहे तें असावें तितकें व्यापक नाही व संगीत-स्वरूपी गेयता हें काव्यलक्षण मानल्यास अनेक अमरपद पावलेलीं काव्यें—महाकाव्यें काव्य-प्रांतांत कशीं बसवितां येतील याविषयीं मोठीच अडचण अुभी राहील व कांही ओढाताण करून त्यांचा अंतर्भाव केल्यास त्यांस संगीतप्राय गेयतेच्या न्यूनत्वामुळे कदाचित् हीन पदावर बसवावें लागेल. क्रमाने या दोनहि मुद्यांचा विचार करूं.

काव्यस्वरूपाचें विवेचन करीत असतां तर्कनिष्ठ शास्त्रीयता बाजूला सारावी हें योग्य नव्हे. तथापि ज्या वाचकांकरिता काव्यलक्षण सांगावयाचें त्यांची केवळ तर्कप्रधान वर्गी-करणाच्या पद्धतीमुळे महत्त्वाच्या गोष्टी कोणत्या आणि आनुषंगिक कोणत्या याविषयीं दिशा-भूल होतां कामा नये. काव्याचा केवळ अनन्यसाधारण विशेष दाखवून गेयता हेंच मुख्यत्वें-करून काव्याचें लक्षण, गेयतेमुळेच काव्याला काव्यत्व प्राप्त होतें अशी समजूत होण्याचा बराच संभव आहे. ज्या पद्धतीने व प्रमाणाने गेयतेचा पुरस्कार प्रस्तुत प्रबंधामध्ये केला त्यावरून वाचकाचें लक्ष्य अितर महत्त्वाच्या विशेषांकडे न वेधतां तें गेयतेकडेच आकर्षिलें जाअील असें म्हणावें लागतें. वाचकाचा असा समज झाला तर तो दोष शास्त्रशुद्ध विवेचन करणाऱ्या प्रबंधकाराचा नव्हे, तर असमंजस वाचकाचा होय' असें प्रस्तुत लेखक म्हणतील. परंतु अेकंदरीने काव्यलक्षण कोणतें हें जाणण्याची वाचकांची अपेक्षा असते. तेव्हा अनन्य-साधारण विशेषावर बोट ठेवलें तरी अेकंदर काव्याचें शरीर कोणतें, त्याचा आत्मा कोणता, याच गोष्टी प्रामुख्याने मांडून त्यांत गेयतेचें स्थान दाखविलें पाहिजे. सूक्ष्म शास्त्रीय चर्चेमध्ये अेक अेक पाअूल पुढे टाकतांना गणित किंवा भूमिति यांतील सरणीप्रमाणे मागील सर्व गोष्टी गृहीत धरतां येतील. परंतु वाङ्मयाच्या सरणीमध्ये प्रमेयाचें सर्वांगीण आकलन वाच-काला होत आहे याविषयीं विशेष खबरदारी घेतली पाहिजे. मनुष्य म्हणजे हसणारा प्राणी किंवा जो बुद्धिविशेषाने युक्त आहे असा प्राणी ही व्याख्या करून शास्त्रकाराचें कार्य झालें तरी जिज्ञासु माणसाने केवळ अनन्यसाधारण विशेषावर लक्ष्य ठेवून प्राणी या शब्दा-मध्ये जो गृहीत अर्थाचा गौरव आहे तो दृष्टीच्या आड करतां कामा नये. निरिंद्रिय, सेंद्रिय असे वस्तूंचे विभाग, तदनंतर सेंद्रिय सृष्टीमध्ये वनस्पति आणि प्राणी, प्राण्यांतहि अेकपेशी प्राण्यांपासून पुढे क्रमशः विकास पावलेले अनेक प्रकारचे मासे, पशु-पक्षी, वानर अित्यादि प्राणी व प्राण्यांचे वर्ग हें सर्व ज्ञान प्राणी शब्दामध्ये अपेक्षित असतें. त्याच-प्रमाणे काव्य हा अेक वाङ्मयप्रकार आहे तर वाङ्मय किंवा ललितवाङ्मय याचे विशेष त्यांत प्राधान्येंकरून असले पाहिजेत याचें यथोचित विवेचन करूनच काव्याचा म्हणून जो अनन्यसाधारण विशेष त्याचा निर्देश करणें योग्य होअील. निदान काव्यस्वरूपाची जिज्ञासा मनांत धरून वाचक प्रस्तुत प्रबंध हातीं घेणार त्या अर्थी काव्यस्वरूपाची समग्र कल्पना देणें हें कार्य महत्त्वाचें आहे. जो शिरोवेष्ट घालीत नाही किंवा ज्याचा वर्ण काळा आहे तो

मद्रासी अेवढ्याने मद्रासी मनुष्याच्या स्वभावाचें किंवा त्याच्या सामाजिक रीतीभातींचें व जीवनाचें ज्ञान योग्य प्रकारें होणार नाही तद्वत् काव्याविषयी केवळ गेयतेचा पुरस्कार केल्याने काव्यस्वरूपाची स्पष्टता होत नाही. तर्कसंग्रहांतील शब्दयोजनेची कसरत करणाऱ्या व्याख्यां-प्रमाणे त्यामुळे फक्त वर्गीकरणाचें कार्य होअील.

संस्कृत साहित्यशास्त्र आणि अिंग्रजी साहित्यशास्त्र यांचा अधिकाधिक परिचय होत असल्यामुळे ललितवाङ्मयाच्या स्वरूपाविषयी अनेक महत्त्वाच्या गोष्टी आपणांस व्यक्त झाल्या आहेत. कला आणि ललितकला, ललितकलांमध्ये ललितवाङ्मय आणि काव्य यांचें स्थान, ललितकलाकृतीमध्ये सौंदर्यदर्शनावर असलेला कटाक्ष, सौंदर्याचे घटक, सौंदर्याचा रस, भावना, कल्पना यांच्याशीं असलेला संबंध, ललितवाङ्मयाच्या आस्वादनामुळे लाभणारा आनंद, त्याचा मानवी जीवनावर होणारा संस्कार या सर्व गोष्टी जशा ललितवाङ्मयाचें स्वरूप विवेचन करतांना दर्शनीय आहेत, तशाच त्या काव्यस्वरूपाचें लक्षण ठरवितांना लक्षणीय आहेत. त्यांवरून विवेचकाची दृष्टि ढळतां कामा नये. परंतु गेयतेचा पुरस्कार करतांना काव्याला जीवभूत असलेल्या रसात्मकतेला ती गद्यांतहि आढळते म्हणून बाजूला काढण्यांत आलें आहे, सौंदर्यदृष्टीला योग्य ती प्रतिष्ठा दिलेली नाही व आधुनिक नाटकांतील रागदारीच्या किंबहुना 'लग्नाला जातों मी द्वारकापुरा' अशा केवळ गाण्याचे चालीवर म्हणतां येणाऱ्या पद्यांस काव्य पदवी देअून संगीताचा पराक्रम गाअिला आहे. यांत काव्यस्वरूपाचें योग्य निदर्शन तर होत नाहीच, परंतु विवेचनाची तर्कनिष्ठताहि डळमळूं लागते असें वाटतें.

आता गेयतेविषयी प्रबंधांतील भूमिका स्पष्ट मांडली पाहिजे. प्रबंधकारांनी या बाबतींत वाल्मीकीचें अुदाहरण घेतलें आहे. व्याधाने क्रूरपणाने केलेला क्रौंचवध पाहून वाल्मीकीचें चित्त कळवळलें आणि 'मा निषाद' अित्यादि गीत भावनोत्कटतेमुळे त्याचे तोंडून बाहेर पडलें. ही गोष्ट त्यांना मान्य नाही. वाल्मीकीला गायनाची मूळचीच आवड नसती तर हें अनुष्टुम् त्यांचे तोंडून बाहेर पडलें नसतें. गाण्याचा कल मूळचा असेल तरच प्रतिभा काव्यरूपाने बाहेर पडेल. कवीपाशीं भावना, कल्पना, विचार व्यक्त करणारे शब्द असतात व त्यांचें स्वयंभू सौंदर्य त्यांच्यापाशीं असतें. परंतु तेवढ्याने भागत नसून संगीताचा आश्रय करतांच ती भावना, कल्पना व ते विचार मूळांत होते त्यापेक्षा दसपट सुंदर वाटूं लागतात. ध्वनीमध्ये मूळचाच स्वतंत्र स्वयंभू असा रस आहे. त्याची व कवीच्या वस्तूंतील रसाची गांठ पडली म्हणजे कवीच्या वस्तूला अकल्पित माधुर्य, तेज व प्रसाद प्राप्त होतात. मनां-तील गूढस्थ भावनाकोश जाग्रत करण्याची शक्ति संगीताच्या अंगीं खास आहे.... संगीताची जोड काव्याला फार अुपकारक आहे किंबहुना काव्याला काव्य हें नांव मिळवून देण्याला तीच सर्वथा कारणीभूत होते अशी गेयतेविषयी आणि काव्यगत संगीताविषयी प्रबंधकारांची भूमिका आहे.

आपल्या साग्रसंगीत नाटकांमध्ये कोणत्या प्रकारें संगीताने थैमान घातलें याची कल्पना वाचकांस नव्याने देण्याचें कारण नाही. अितरथा नाट्यसंवादांमध्ये नाट्यवस्तूचा स्वभावसुंदर विकास होत असतांना पदोपदीं पदक्षेप करणारीं संगीत पद्यें पुष्कळदा अनाठायीं असतात असें दिसून येअील. काव्यवस्तूचा सौंदर्यविकास करण्यापेक्षा श्रोत्याला संगीत-श्रवणामुळे आनंद द्यावा हाच त्यांचा प्रधान हेतु असतो. सुंदर रागदारीचीं समयोचित पद्यें

अनुक्रमणिका

असा आनंद देतात याविषयी मतभेदाचें कारण नाही. परंतु रंजनात्मक नाटकांमध्ये अशा संगीताचें कार्य योग्य तेथे मान्य केलें, तरी अेकंदर काव्यामध्ये रागदारीच्या संगीताचें कार्य असें प्रमुख मानतां येणार नाही. त्याचप्रमाणे जुन्या वृत्तांमध्ये रचिलेल्या काव्यापेक्षा नाटकांतील संगीत पद्यांच्या चालीवर लिहिलेल्या आधुनिक काव्याचें श्रेष्ठत्वहि त्यामुळे सिद्ध होणारें नाही. स्वतंत्र स्वरप्रसराच्या सौंदर्यामुळे आनंद देणारें संगीत काव्याच्या स्वरूपामध्ये अपेक्षित नाही. असें संगीत म्हणजे काव्यगत गेयता नव्हे. त्यामुळे गेयतेचा फार संकोच होणार असून Epic, Dramatic, Lyric. अित्यादि जे काव्याचे प्रकार आहेत त्या सर्वांमध्ये अशी संगीतप्राय गेयता दिसून येत नसल्यामुळे व वाचकालाहि असें संगीताचें ज्ञान प्रायः सुलभ नसल्यामुळे काव्यक्षेत्रामध्ये अनवस्था अुत्पन्न होणार आहे. आधुनिक काव्यें काव्य-गायनामुळें कितीहि लोकप्रिय झालीं किंवा नाटकांतील पद्यें सामान्य लोकांच्या तोंडामध्ये घोळलीं गेलीं, तरी तेवढ्याने त्यांच्या संगीतक्षमतेमुळे तीं उत्तम काव्य म्हणून टिकतील असें मानण्याचें कारण नाही. ज्यांत खरें काव्यसौंदर्य असेल तेंच काव्य टिकेल. संगीत ही स्वतंत्र ललितकला आहे. तिच्यामध्ये ललित आनंद देण्याचें सामर्थ्यहि आहे. परंतु गेयतेच्या द्वारा तिने काव्यकलेच्या क्षेत्रावर आक्रमण करण्याचें कारण नाही. काव्याचा केवळ अनन्यसाधारण धर्म तेवढाच विलगपणें घेअून त्याचा वृथा गौरव न करतां काव्यगुणांचा सामग्र्याने विचार केला तर काव्याचें महत्त्व रसात्मकतेवर, भावनांच्या सौंदर्यावर व त्याचें व्यंजन करणाऱ्या रसोपकारी शब्दार्थांच्या नादमाधुर्यावर म्हणजे गेयतेवर अवलंबून आहे असें दिसून येअील. कटावादि चालींवर लिहिलेलें काव्य लोकप्रिय होत असेल तर तें त्याच्या संगीतामुळे, संगीताने अुत्पन्न होणाऱ्या विलोभनामुळे. परंतु या कटावाच्या किमयेपुढे केकावलीने गतप्रभ होण्याचें कारण नाही. पूर्वी ज्यावेळीं ऋग्वेदांतील सूक्तें लिहिलीं गेलीं, अमीरअुमरावांच्या पदरीं असलेल्या बंदिजनांनीं होमरच्या Illiad and Odyssey सारखीं किंवा त्यांना आधारभूत अशीं वीररसप्रधान काव्यें ज्या वेळीं गाअिलीं, त्या वेळीं काव्यरसिकांना लेखनिविष्ट किंवा मुद्रित काव्यें वाचणें हें अशक्य असल्यामुळे गेयता हा, त्या काव्यांचा विशेष होता हें खरें. परंतु आधी लिपी व अलीकडे मुद्रण यांचा व्यवहार सुरू झाल्यावर काव्यस्वरूपामध्ये होत गेलेला फरक विसरतां येत नाही. काव्यलेखनाच्या वेळीं कवि स्वतःशीं गुणगुणत असेल व काव्यवाचकहि वाचतांना मनांतल्या मनांत अेक प्रकारच्या गेयतेचा अनुभव घेत असेल, परंतु ही गेयता म्हणजे पूर्वोक्त शाहीरांचें खडें संगीत नव्हे. ती केवळ सर्व प्रकारच्या काव्यव्यापारामध्ये सूक्ष्मपणें वावरणारी, भावसृष्टीच्या सौंदर्याशीं संलग्न अशी शब्दार्थसंगति आहे. कांहीअेक प्रमाणावर तिच्यामध्ये नादमाधुरी दिसून येते. तिला rhythm असें व्यापक नांव देतां येअील. स्वतंत्र संगीताच्या गेयतेपेक्षा अशा पदरचनासंहतीचे–रीतीचें–स्वरूप निराळें आहे. लक्ष्यांत ठेवावयाचें अितकेंच की, 'Poetry is musical, but not pure music.' अशा प्रकारचा वर्णसंवाद किंवा रसोपकारी शब्दांची ठेवण म्हणजे स्वर-प्रसरावर अवलंबून असलेलें संगीत नव्हे. काव्यामध्ये कोणत्या तरी वृत्तबंधाचा आश्रय केल्या-मुळे त्याच्या विवक्षित रचनेप्रमाणे त्यांतील घटकांच्या मात्रा, थांबण्याचीं ठिकाणें, शब्दांवरील जोर, किंचित् आरोह–अवरोह व या सर्वांमुळे अगदी साध्या स्वरूपाचें, वृत्त-शरीरांतून व्यक्त होणारें नादमधुर आंदोलन कोणत्याहि काव्याचें वाचन करीत असतां अनु-भवास येतें. वृत्तबंधनांतून प्रकट होणाऱ्या या माधुरीची, स्फुट स्वरप्रसरांच्या योगाने ज्याची अुभारणी होते अशा संगीताशीं तुलना करतां येणार नाही. काव्यगत नादमाधुर्य

अनुक्रमणिका

हें अगदी पूर्वी किंवा कांहीं गेय काव्यांच्या बाबतींत संगीतसम असलें, तरी अेकंदरीने काव्य-राशीचा विचार केल्यास त्याला संगीत म्हणतां येणार नाही. काव्यगत नादमाधुरीचा अनुभव मनांतल्या मनांत काव्य वाचीत असतांहि येतो. मुक्तच्छंदामध्ये जी हजारो ओळी कविता निरनिराळ्या भाषांत लिहिली आहे, तेथे प्रकट संगीत नसून फक्त अनुकूल वर्णरचनेच्या स्वरूपाचें rhythm आहे, कलात्मक शब्दयोजना आहे, अितकेंच दिसून येअील. आर्या-भारताच्या वीस हजार आर्यांमध्ये किंवा ओवी वृत्तांतें लिहिलेल्या ज्ञानेश्वरींत स्वरप्रसरात्मक संगीताचा अनुभव कसा येणार? अुलट, तेंच तें आर्यावृत्त आणि ओवीवृत्त यांमुळे त्या दृष्टीने कंटाळा वाटेल. परंतु रसप्रधान काव्यग्रंथांत स्वतंत्र संगीताची अपेक्षाच करतां येत नाही. त्या ग्रंथाचा मोठेपणा त्याच्या वाङ्मयीन गुणांवर अवलंबून. त्यांत सामान्य स्वरूपाची वृत्तयोजना आणि केवळ संगीतांत ज्याला फारशी प्रतिष्ठा सांगतां येणार नाही अितकाच शब्दार्थांचा आणि अनुकूल वर्णांचा सुसंवाद आढळून येअील. फेअरी क्वीन, कँटरबरी टेल्स्, पॅरडाअिज लॉस्ट, शेक्सपीअरचीं नाटकें व सर्व प्रकारची आत्मलक्षी किंवा वस्तुवर्णनप्रधान कविता यांत अेक प्रकारची नादसंगति आहे. परंतु तें संगीत नव्हे. त्याची अपेक्षाहि नाही. कांहीं अुदाहरणें घेतल्यास याची स्पष्टता होअील.

Three years she grew in sun and shower
Then Nature said, "A lovelier flower
On earth was never sown;
This child I to myself will take;
She shall be mine, and I will make
A lady of my own.
"Myself to my darling be
Both law and impulse....

—*Wordsworth*

They but now who seemed
In bigness to surpass Earth's giant sons
Now less than smallest dwarfs, in narrow room
Throng numberless— like the Pygmaean race
Beyond the Indian mount or faerie elves,
Whose midnight revels, by a forest side
Or fountain, some belated peasant sees,
Or dreams he sees, while overhead the Moon
Sits arbitress, and nearer to the Earth
Wheels her pale course... .
Thus incorporeal spirits to smallest forms
Reduced their shape immerse.

—*Milton*

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्
छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखाः गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ —भगवद्गीता

दृष्टिस्तृणीकृतजगत्त्रयसत्त्वसारा धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् ।
कौमारकेऽपि गिरिवद् गुरुतां दधानः वीरो रसः किमयमेत्युत दर्प एषः ॥ —भवभूति

झळकतां दंतपंक्तींचा रंग । पाषाण होती पद्मराग ।
स्मित होतां मूतळीं चांग । रत्नराशी विखुरती ॥
पाय ठेवितां महीमंडळीं । सुवर्णकमळें सहस्रदळीं ।
उगवती तेथें परागधूळी— । माजी लोळे वसंत ॥ —मुक्तेश्वर

तो शर कृत्यानळसा दुर्घट चक्रोद्धतिक्रियानळसा
गांठी कुरुबलविजयप्रासादाच्या रविप्रभाकळसा ।
शाणनिशितमुख बाण प्राणभृदीड्यार्कसूनुच्या अमळा
खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसाचि शिरकमळा ॥ —मोरोपंत

तुझ्या विछिन्न रूपाला बघूनी फाटतो ऊर
हळाळे जीव; अश्रूंचा स्मृतींनी दाटतो पूर ॥
तटांच्या मंगल्या भिंती फुटोनी चौथरा गेला
जळालीं वैभवें सारीं; निमाले छातिचे शूर ॥ —गिरीश

वरील काव्यपंक्तींमध्ये काव्यगुणाचें महत्त्व रसात्मकतेवर आणि भावनिदर्शनावर अवलंबून आहे की गेयतेवर आहे हें सहजीं लक्षांत येईल. मिल्टनच्या उतान्यामध्ये पद्याच्या चालीचें संगीत कोठे आहे ? अनुकूल भावेचा ओघ आहे. अगदी साधें निर्यमक वृत्त आहे. त्यात गेयतेचें प्रमाण अल्प असून पदपद्धतीचा सुबकपणा आणि वर्णनोपयोगीत्व हेच गुण दिसून येतात. The moon wheels her pale course यांत rhythm आहे, संगीत नाही. संगीताची अपेक्षाहि रसिक करणार नाही. अशा काव्यराशीला दश पटीने रसात्मकता वाढविणाऱ्या संगीताची कसोटी कशी लावतां येईल ? स्वर्गांतून पतन पावलेल्या सेटनच्या अनुयायांच्या शरीराकृति पूर्वी फार मोठ्या पर्वतप्राय होत्या परंतु आता त्यांनी अगदी लहान रूपें धारण केलीं होतीं आणि लहानशा जागेमध्ये त्या असंख्य प्राण्यांनी गर्दी केली होती. त्यांचें यथोचित वर्णन करण्याकरिता मिल्टनने ज्या सुंदर उपमा दिल्या आहेत त्यांवर काव्याचें सौंदर्य प्रायः अवलंबून आहे.

"दृष्टिस्तृणीकृतजगत्त्रयसत्त्वसारा" या पद्यांत त्रिभुवनाला तुच्छ लेखणारी दृष्टि आणि पृथ्वीला वाकविणारी धीरउद्धत अशी गति इत्यादि जें सरस वर्णन आहे त्याचें काव्यसौंदर्य गेयतेवर आणि संगीतावर प्रतिष्ठित आहे? असे श्लोक पुष्कळ वेळा रागदारीच्या पद्धतीने गाण्याचा प्रयत्न करण्यांत येतो, परंतु त्यामुळे रसास्वाद अधिक न घडतां केवळ संगीताकडेच लक्ष्य वेधतें. वाङ्मयीन रसास्वादनाचे वेळीं असें संगीत अप्रस्तुत होय. त्यापेक्षा प्रस्तुत पद्य मनांत वाचलें तर त्यांत कुमाराचें जें अद्भुत व्यक्तित्व त्याकडे चित्त आकृष्ट राहील आणि व्यक्तित्वाच्या वर्णनामध्ये जे रसोपकारी वर्ण आणि शब्द आहेत त्यांमध्ये कांही आरोहअवरोह आहे व त्यामुळे जो सुसंवाद (rhythm) उत्पन्न होतो त्याचाहि अनुभव

येअील. परंतु त्याला गेयता हें नांव दिलें तरी त्यांत स्वरप्रसरात्मक संगीताचा गंध नाही. अशा गेयतेचें व्यापक स्वरूप कोणतें याविषयींच आम्हांला विचार करावयाचा होता. काव्यांत कोणतीहि नादमाधुरी किंवा शब्दाक्षरांची संगति नसते असें म्हणण्याचा आशय नाही.

त्याचप्रमाणे गेयता म्हणजे rhythm हें काव्याचें अनन्यसाधारण लक्षण निवडून दाखवीत असतां तें मुख्यत्वेंकरून ललितवाङ्मय आहे, तेव्हा सुंदर भावना, सुंदर कल्पना, प्रतिभेचा विलास अित्यादि ज्या वाङ्मयीन गुणांवर काव्याचें माहात्म्य अवलंबून आहे त्यांकडेच आस्वादकाचें लक्ष्य प्रामुख्याने वेधतें. त्याचें महत्त्व सर्वाधिक आहे. रस हा काव्याचा आत्मा आहेः तो त्याचा असाधारण गुण नसेल, परंतु असाधारण काव्यगुण कोणता हें निवडून दाखवितांना अितर वाङ्मयप्रकारांत साधारण असे जे समवायी गुण (inherent qualities) त्यांकडे दुर्लक्ष्य होअूं नये. ज्या प्रकारें गेयतेचा पुरस्कार प्रस्तुत प्रबंधामध्ये केला आहे त्यावरून असा दृग्भ्रम होण्याचा संभव आहे. म्हणून तत्संबंधीं विवेचन करणें आवश्यक वाटलें.

गेयतेविषयीं आणखी अेका मुद्याचें विवेचन आवश्यक वाटतें. काव्यव्यापार हा नेहमी गेयतेच्या साथीवर होतो, तेव्हा गेयता हेंच काव्याचें स्वतंत्र लक्षण होय. गेयतेच्या मर्यादा पूर्वीं दाखविल्या आहेत. आता प्रबंधकारांचें म्हणणें असें की, काव्यवस्तूचे जे स्वयंभू बोल म्हणून समजतों ते वास्तविक पाहतां अत्यल्प असून त्याला जें अेवढें सौंदर्य प्राप्त झालें तें गेयतेच्या किमयेमुळे...त्याच्या भावनेला, विचाराला व कल्पनेलाहि गेयता सुरसपणाची स्वतंत्र जोड देते अितकेंच नव्हे तर त्याच्या स्फूर्तीला सुद्धा ही गेयता सुंदर स्फुरण देते... संगीत हें कवीला मूळ प्रतिभाच प्राप्त करून देते असें मात्र मला म्हणावयाचें नाही. काव्य व्यापारांत गेयतेला तिचें योग्य श्रेय दिलें पाहिजे. काव्यदेवता Muse and music संगीत यांचा सहोदरसंबंध आहे हें व्युत्पत्तिबलाने सुचवून संगीतामुळे काव्याला नवी गोडी येते व संगीत हें प्रतिमाचक्राला माधुर्याचें ओंगण पुरवितें हीं दोन ऋणें कवींनी मान्य करावीं असें प्रतिपादिलें आहे. गद्यरूपाने तीच भावना व्यक्त केली तर कमी रसात्मक दिसते. तीच वृत्ताच्या अगर संगीताच्या रूपाने प्रकट झाल्यास तिची गोडी तिप्पट किंबहुना दसपट वाढते.

या प्रतिपादनांत अेक गोष्ट चिन्तनीय अशी की वृत्त किंवा संगीत हें रसात्मकता पटींनी वाढवूं शकतें; मूळ रसाची नुसती खुलावट करतें असें नव्हे. हिऱ्याचें तेज सुवर्णाच्या कोंदणाने वाढतें हें म्हणणें निराळें आणि, कोंदण हें मूळ हिऱ्याचें जें पाणी त्याचा स्वगत तेजोगुण वाढवूं शकतें—मूलतः तेथे कमी असला तरी तो पटींनी अुत्पन्न करूं शकतें, हें म्हणणें निराळें. अशा प्रकारचें श्रेय प्रबंधकारांनी गेयतेला आणि संगीताला दिलें आहे. त्यांचें म्हणणें असें की, प्रतिमा अुत्कट झाली म्हणून 'मा निषाद प्रतिष्ठां त्वं...' अित्यादि अनुष्टुभ् सहजगतीने बाहेर पडलें असें म्हणतां येत नाही. गाण्याकडे कल मूळचाच असावा लागतो. तो असला तरच प्रतिमा काव्यरूपाने बाहेर पडेल. गेयता ही स्फूर्तीला स्फुरण देणारी आहे.

अेकंदर काव्याविषयीं विचार चालू असतां अशा अेखाद्या अनुष्टुभाची अुत्पत्तिकथा निर्णायक होत नाही. वाल्मीकीने रामायणासारखें महाकाव्य लिहिलें तें केवळ त्याचा गाण्याकडे कल होता म्हणून काय ? गाण्याचा कल हा प्रतिभा काव्यरूपाने प्रकट करण्यास सर्वस्वीं

जबाबदार आहे काय ? तिचा दीर्घकालीन व्यापार चालू ठेवण्यास गेयताच जबाबदार आहे काय ? ओंगण घालून चक्र फिरतें परंतु चक्र फिरण्याला लागणाऱ्या मूळ शक्तीचें सर्वाधिक महत्त्व नाहीं काय ? भावनेचा पद्यरूपाने आविष्कार होत असला तरी तो भावनेच्या सामर्थ्यामुळे; पद्यरचनेच्या सराईतपणामुळे नव्हे; ही गोष्ट महत्त्वाची आहे. रसात्मकता गद्य ग्रंथांतहि दिसून येते, तर ती काव्यामध्ये पद्यरूप कां धारण करते याचा निर्णय करणें जरूर आहे.

काव्यनिर्मिति कशी होते याचा विचार करतां असें दिसून येईल की कवीला वर्ण्य-वस्तुविषयीं जें भावनांचें सौंदर्य भासत असतें तें तो काव्यांत शब्दार्थांच्या द्वारा व्यक्त करीत असतो. कवीचा हा व्यापार सौंदर्यैकदृष्टीचा असतो. त्याला केवळ सत्य सांगावयाचें असें नव्हे, तर सत्यांतील सौंदर्य व्यक्त करावयाचें असतें. त्याच्या वैचित्र्यपूर्ण अनुभवराशींमध्ये भावनात्मक जीवनमूल्यांचें सौंदर्य त्याला दृग्गोचर झालेलें असतें तें व्यक्त करीत असतां सहायभूत जे शब्दार्थ आणि वर्णविशेष त्यामध्ये अंतःसौंदर्याला अनुरूप असें आकृति-सौंदर्य हें त्यास प्रायः आवश्यक वाटतें; स्त्रियाला कोंदण असावें त्याप्रमाणे भाषाशैलीहि आपल्या शरीराच्या कातडीप्रमाणे काव्याच्या सुंदर अंतरंगाचाच आविष्कार आहे असेंहि म्हणतां येईल. परंतु rhythmic language, रसानुकूल वृत्तबंध आणि वर्णमाधुरी यांची अुपकारिताहि कवीला नेहमीच अिष्ट वाटते. वृत्तें जुनीं असोत वा नवीं असोत; वर्ण्य-वस्तूचें भावनात्मक सौंदर्य अनुकूल शब्दसंहतीच्या पदन्यासाने सुंदरपणें व्यक्त होतें व आपल्या ललित आशयाची गुंफण योग्य प्रकारें व्हावी म्हणून गद्यात्मक भाषेपेक्षा तो पद्य-पद्धतीचा— गेयरूप भाषेचा— आश्रय करतो. म्हणजे चित्रकाराने ज्याप्रमाणे आपला आशय व्यक्त करण्याकरिता अनुकूल रंग मिळाले पाहिजेत, अुत्तम संगीताचा परिपाक साधण्या-करिता गाणाराने ज्याप्रमाणे सुसंवादी स्वर आळवले पाहिजेत, त्याचप्रमाणे सुंदर काव्यवस्तूच्या योग्य अभिव्यक्तीकरिता सुंदर नादमय शब्द पाहिजेत. मुक्तच्छंदामध्येहि या नियमाची हेळ-सांड करतां येत नाही. त्यांतहि rhythm साधावें लागतें. तेव्हा भाषाशैलीच्या गेयतेचा संबंध काव्यवस्तूच्या अंतःसौंदर्याशीं आहे. परंतु तो आश्रयआश्रयी अशा स्वरूपाचा आहे. सुंदर भाषाशैली ही सुंदर वर्ण्यवस्तूच्या आश्रयाने व्यक्त होते. तेव्हा काव्यगत गेयता ही प्रतिभाचक्र चालू ठेवण्याला तत्त्वतः जबाबदार नाहीं आणि काव्यवस्तूच्या सौंदर्यांत दस-पटीने मौलिक भर टाकण्याचेंहि श्रेय तिला देतां येणार नाही. काव्याने संगीताचा आश्रय केला म्हणजे काव्याची माधुरी वाढते हें खरें नव्हे. अशा माधुरीवर खरें काव्य अवलंबून नसतें. ती माधुरी केवळ संगीतात्मक म्हणजे स्वरप्रसरोद्भव असते. काव्याचें सौंदर्य त्यांतील रसात्मकतेवर म्हणजे भावनांच्या सौंदर्यावरच अवलंबून असतें. रस हाच त्याचा आत्मा. रसात्मक गद्यापासून अनन्यसाधारणत्व दाखवावयाचें तें तर्कशुद्ध विभागणीच्या दृष्टीने. गेयता या अनन्यसाधारण विशेषावर बोट ठेवून काव्याची सौंदर्यात्मकता व रसात्मकता कोणाहि काव्यहृदय जिज्ञासूला दृष्टीआड करतां येणार नाही. किंबहुना काव्यविचारांत तर्कदृष्टि ही काव्यदृष्टीपेक्षा गौणच मानावी लागेल.

---

# आमचे तात्या



लेo—सौ. सुशीला चिकटे

महाराष्ट्राचे वा. म. जोशी आणि आमचे तात्या ! आमच्या आवडत्या तात्यांनी आपल्या सर्व सुहृद्‌जनांचा त्याग करून निरंतरची विश्रांति घेतली त्याला आज अेक वर्ष होत आहे. त्यांच्या मृत्यूची जाणीव मनाला अेकीकडून अतिशय दुःखकारक होत आहे आणि दुसरीकडून त्यांच्या सहवासांत घालविलेल्या क्षणांची सुखकारक आठवण त्या दुःखालाहि अेक तऱ्हेची करुण मधुरता आणीत आहे.

तात्यांना मी प्रथम पाहिलें त्या वेळीं मनाचा जो गोंधळ अुडाला त्याचें पुरेसें वर्णन करतांच यायचें नाही. वा. म. जोशी म्हणजे 'रागिणी'सारखी तत्त्वज्ञानविषयक कादंबरी लिहिणारे साहित्यिक; अनेक साहित्यपरिषदांचीं अध्यक्षस्थानें मंडित केलेले विद्वान्; मोठ्या पगाराच्या जागा सोडून ध्येयाच्या पूर्ततेकरितां स्वार्थत्याग करणारे ध्येयवादी. मग माझ्या कल्पनेच्या नेत्रांसमोर अुंच, भव्य, रुबाबदार अशी मूर्ति अुभी असल्यास नवल तें काय !

पण कल्पनासृष्टि आणि सत्य यांत केवढी विसंगति ! किरकोळ शरीरयष्टि, सर्वसामान्य बुद्धिमत्तेचें प्रदर्शन करणारा व सुकूं लागलेल्या पुष्पासारखा दिसणारा चेहरा, साधा—थोडासा गबाळाच—पोशाख अशी तात्यांची वार्धक्याची छाया पडलेली श्यामलमूर्ति पाहून पर्वतशिखरावरून दरींत कोसळल्यासारखें वाटलें. पण ते आमच्याशीं मोकळेपणाने बोलूं लागल्यावर त्यांच्या मोठेपणाच्या कल्पनेने आणि प्रत्यक्ष दर्शनांतील अपेक्षाभंगाने स्तिमित झालेलें मन लागलीच सत्यसृष्टीच्या समपातळीवर आलें आणि आम्हांला वाटलें "अरे, तात्या तर आपल्यासारखेच अेक साधेसुधे गृहस्थ आहेत !"

पण तें कळलें त्या वेळींच ते आमच्यापेक्षा वेगळे आहेत हेंहि कळूं लागलें. प्रथमपरिचयाला तात्या सुलभ होते म्हणून त्यांच्या व्यक्तित्वाला कांहीच कमीपणा येत नाही. नूतनपरिचिताशीं मोकळेपणाने बोलायला सुरवात झाल्यावर ओघानेच त्या संभाषणांत काव्यशास्त्रविनोदरस वाहूं लागे, त्या वेळीं तात्यांच्या व्यक्तित्वाची किंमत आम्हांला कळे. धो धो वाहणाऱ्या प्रचंड सरितेचा प्रवाह आपल्याला पूर्णपणाने दृश्य असला तरी त्याचें विशालत्व व असामान्यत्व थोडेंच कमी होतें ! तात्या सुरवातीलाच मोकळेपणाने बोलत खरे पण त्याबरोबरच आपल्या विनोदी भाषणांतून ज्ञानाचा लाभ करून देत त्यामुळे त्यांच्या सामान्यत्वांतच असामान्यत्व भरलेलें होतें हें पटल्याशिवाय राहत नसे. अेवढ्या मोठ्या गौरवाचें तेजोवलय भोवतीं प्रकाशत असतांना यत्किंचितहि गर्व न वाहतां सामान्य मुलींशीं बोलणें वाटतें तेवढें सोपें नाही. वाऱ्यावर गानलहरी जितक्या सहजतेने तरंगतात तितक्याच सहजपणें आपला कीर्तिगौरव मनाशीं बाळगणें आणि त्याचें तेज असह्य होअूं न देतां तें सुसह्य करणें ही गोष्ट फारच थोड्यांना साधते.



अनुक्रमणिका

आम्ही प्रथमच कॉलेजांत गेलों त्या वेळीं तात्या म्हणाले, "या पहा महाराष्ट्राच्या अुदयोन्मुख तारका." पण तारका या शब्दाला सध्या असलेला अर्थ ध्यानांत येअून लागलीच ते म्हणाले, "तारका म्हणजे लेखिका, विदुषी, बरं का! नाहीं तर तुम्हांला वाटायचें की आता येथे अभिनयनृत्याचे पाठ मिळणार की काय!" अेक दीर्घ निःश्वास सोडून ते पुढे म्हणाले, "कोणीं सांगावें, होतीलहि तारका निर्माण!" त्या वेळीं मी अेकदम म्हटलें, "अन् विदुषी नाही का? तात्या हसून म्हणाले, "हो! हो! होतील की! मी तुमच्यापेक्षां जास्त आशावादी आहें. विदुषीच का, विदूषिकासुद्धां होतील."

तात्या जसे घरगुती वातावरणांत वावरायचे तसेच वर्गातहि दिसावयाचे. नीटनेटका स्वच्छ पोशाख त्यांना माहीतच नव्हता. व्यवस्थित पोशाखांत ते क्वचितच दिसत. फक्त आमच्या कॉलेजच्या गॅदरिंगसमयीं मात्र पांढरा कोशा, लांब पिवळट रेशमी कोट व स्वच्छ धोतर अशा जाम्यानिम्यांत तात्या रुबाबांत हिंडायचे. अन् मग आम्ही कौतुकाने हसलों की आपणहि हसायचे आणि म्हणायचे, "अहो, लग्नांत सासऱ्याने दिलेला पोशाख आहे." त्यावर अेकदा आमच्यांतली अेक धीट मुलगी म्हणाली, "अगदी रुसून घेतला का?" बोलतां बोलतां त्यांनी कॉलेजच्या व्हरांड्याच्या मोठमोठ्या खांबांवरून लोंबकळणाऱ्या वेलाचीं पानें व लाल लाल फुलें ओरबाडलीं आणि ते म्हणाले, "या पोशाखांत आज जरा तरुण झाल्यासारखें वाटतंय् मला."

अेकदा फिश-पॉंड च्या वेळीं त्यांना साबणाची वडी आणि ॲश-ट्रे देण्यांत आला होता. त्यानंतर सात आठ दिवस त्यांचे कपडे स्वच्छ होते. मग पुन्हा पहिल्यासारखेच. अेक विद्यार्थिनी हळूच म्हणाली, "साबूची वडी संपलेली दिसतेय्." त्यावर तात्या हसून म्हणाले, "छेः हो! धोतरें नवीं होतीं तीं जुनीं व्हायला लागलीं."

तात्यांना वर्गात शिकवतांना फारशीं पुस्तकें कधी लागत नसत, व ते कधी आणीतहि नसत. शिकवायचें पुस्तक तेवढें आणायचें. कधी कधी तेंहि विसरायचे आणायला. अेकदा ते पांच-सहा जाडींजुडीं पुस्तकें घेअून आले अन् आमच्या हास्यांत आपलें हास्य मिळवीत म्हणाले, "अहो, करतां काय? मला भीति वाटूं लागली की विद्यार्थिनी माझी किंमत तर कमी करीत नाहीत ना? कारण मी जाडजाड पुस्तकें आणून तुम्हांला दिपवीत नाही ना? म्हणून म्हटलें, आज घेअून जावें अन् दाखवावें तुम्हांला की मलासुद्धा जाड जाड पुस्तकें पेलतां येतात. बाकी असें करण्यांत मी माझ्या विद्वत्तेचा अुगम दाखवला तुम्हांला. अहो, आम्ही प्रोफेसर म्हणजे काय! तुमचे वाटाडे, दिग्दर्शक, ज्ञानमधु कोणत्या पुष्पांतून चाखावा तिकडे नुसतें बोट दाखवतों आम्ही. अमुक मार्गांनी गेलें असतां तुम्ही ज्ञानदेवीच्या मंदिरांत जाअून पोचाल अेवढेंच आम्ही सांगणार. फार तर तुमचा हात धरून सोबत करूं; मार्गातले कांटेकुटे काढून टाकूं. पण नंतरचें काम तुमचें."

तात्यांनी मानसशास्त्र शिकवतांना स्वतःचें असें फारसें कांही सांगितलेंच नाही. निरनिराळ्या पाश्चात्य पंडितांच्या विचारप्रणालींचें तुलनात्मक दृष्टीने विवरण करून आमच्या विचारांना चालना द्यावयाची. नंतर नेहमीच्या व्यवहारांतील सिद्धान्त घेअून साधकबाधक चर्चा करावयाची अशी त्यांची पद्धति असे. शिकवतांना ते अगदी साधे दाखले देत. मुलींवर साधेच पण अेकदम पटणारे प्रयोग करीत. अेकदा ते सबकॉन्शसमध्ये कांही गोष्टी दडून राहतात पण जरूरीच्या वेळीं अेकदम प्रकट होतात या मुद्द्याचें विवरण करीत होते. तेव्हा

त्यांनी समोर अेका मुलीला अुभें केलें. त्या मुलीचें बडोद्यास लग्न जमत होतें तें त्यांना माहीत होतें. ते म्हणाले, "मी आता गांवांचीं नांवें घेतों हं. पुणें, मुंबअी, नाशिक, कल्याण, बडोदें...पहा त्यांची मुद्रा पाहा." त्या मुलीची लाजरी मुद्रा पाहून आमची खूप करमणूक झाली.

मानसशास्त्रांतील संवयीची मीमांसा करीत असतांना कांही गोष्टी आपण निव्वळ संवयीने कशा करतों हें ते सांगत होते. बोलतां बोलतां त्यांनी दरवाजा बंद करा असें सांगितलें असें आम्हांला वाटलें म्हणून अेकीने दरवाजा बंद केला. थंडीच्या दिवसांत गार वाऱ्याचे झोत अंगाला झोंबत म्हणून तात्या कधी कधी दार लावावयाला सांगत. तात्या हसून म्हणाले, "पाहा हा संवयीचा परिणाम. मी काय म्हणालों त्याचा नीट विचार सुद्धा कुणीं केला नाही. मी म्हणालों, There was a banker आणि तुम्ही समजलां "दरवाजा बंद कर!"

अशा मनोरंजक पद्धतीने शिकवीत असल्याने त्यांचा तास कधीच कंटाळवाणा वाटला नाही. शिवाय, त्यांच्या तासाला आम्हांला प्रश्न विचारायला, शंका काढायला पूर्ण मुभा असे. त्यामुळे नुसतें प्रवचन अैकल्यासारखें न वाटतां संभाषण केल्याचें समाधान मनाला वाटून ताणहि कमी पडत असे. तात्या वर्गांत आले अन् अर्धा पाअुणतास सारखे बोलत सुटले असें कधीच झालें नाही. अर्थात् हें कबूल केलेंच पाहिजे की तासभर सतत भाषणाचा ओघ अस्खलितपणें चालू राहील अशी वक्तृत्वकला त्यांच्याजवळ नव्हतीच, पण ते कधी विषयान्तरहि करीत नसत. तुटकपणानेच पण विषयाचें सूत्र न सोडतां ते चर्चा करीत. तात्यांना पुनरावृत्ति करण्याची बरीच संवय होती. मागच्याच विषयाला त्यांनी सुरवात केली म्हणजे समजावें की तात्यांनी पुढचें वाचलेलें नाही. तेंच अुदाहरण पुन्हा दिलें म्हणजे तात्यांना आठवण नाही तें अुदाहरण दिल्याची असें आम्ही समजत असूं. बहुतेक पहिल्याच वेळेला तात्या अितकें पूर्णपणाने विषयाचें प्रतिपादन करीत की त्याची पुनरावृत्ति अगदी कंटाळवाणी होअी. अथाङ्ग भरलेल्या सरितेचा प्रवाह शेवटीं शेवटीं जसा अगदी संथ होतो त्याप्रमाणे तात्यांचें विद्वत्तापूर्ण अध्यापन अगदी शान्त असे.

तात्या कॉलेजांत आम्हांला कधी चिडलेले, रुसलेले दिसले नाहीत. कॉलेजचा कोणताहि समारंभ असो, अेखाद्या वक्त्याचें व्याख्यान, मुलींचे वादविवाद, सेक्रेटरींची निवडणूक कांहीहि असो, तात्यांची स्वारी अुपस्थित असायचीच. स्वतः वक्त्यांना प्रश्न विचारतील, मुलींना विचारावयाला लावतील. पिंगपाँगच्या खोलींत हजर राहून नवशिक्या विद्यार्थिनीला खेळावयास शिकवतील, तर कधी अेखाद्या चँपियन विद्यार्थिनीशीं खेळून आपलें क्रीडानैपुण्य दाखवतील. टेनिस कोर्ट, बॅडमिंटन कोर्ट, सगळीकडे त्यांचें अस्तित्व असेच. फार काय, तात्यांना गाणें मुळीच कळत नसे, पण गाण्याची बैठक कांही चुकवली नाही तात्यांनी. या त्यांच्या स्वभावामुळे तात्या म्हणजे सदाफुलीचें फूल वाटत.

पण तात्यांच्या घरीं गेल्यावर तात्यांच्या जीवाला काय शल्यें टोंचत असावींत ह्याची कल्पना यायची. घराला गृहमंदिराचें स्वरूप आणून देणाऱ्या गृहिणीविना तात्यांचें घर अगदी भकास दिसे; तसेंच त्यांचें आयुष्यहि. सिगरेट ओढीत कुठे तरी शून्यांत नजर लावून तात्या बसलेले दिसावयाचे. टेबलावर, बिछान्यावर पुस्तकें अुलथीं पालथीं पडलेलीं, त्यांतच सिगरेटचीं थोटकें वगैरे.

आम्ही घरीं गेलों म्हणजे तात्यांना आनंदच व्हायचा. आंबे, चहा, दाणे, गूळ जें असेल तें आमच्यापुढे करायचे आणि सांगायचे, "चहा करा चांगलासा." अेकदा आम्ही गेलों होतों त्या वेळीं तात्या म्हणाले, "आज मी हॉटेलमध्ये चहा प्यायला जाअीन म्हटलें तर खिशांत पैसा नाही. पण मी भीत नाही. येतील कुठून तरी पैसे." त्यांना पहिला तास नसला तरी ते कॉलेजांत येअून बसायचे. अेकदा याबद्दल आम्ही चेष्टा केली त्यांची की अेखादा खेडवळ मनुष्य स्टेशनवर गाडीच्या वेळेच्या खूप आधी येअून बसतो त्यांतलेंच हें. त्यावर ते हसले अन् म्हणाले, "करा चेष्टा. पण घरीं बसून करायचें काय? अिथें आलें म्हणजे वेळ तरी जातो." वरकरणीं हसून दिलेल्या त्या अुत्तरांत किती कारुण्य व्यक्त होत होतें! त्यांच्या आयुष्याचें दैन्य अुघडें पडलें होतें. अशा वेळीं माझ्या मनाला वाटे, "आता हे दिवस का आहेत तात्यांचे लेखन करायचे! तेज संपत आलेल्या दीपज्योतीप्रमाणे सध्या अवस्था झाली आहे. अस्ताला चाललेल्या दिवाकरासारखी त्यांची स्फूर्ति मलूल होत चालली आहे. आपण त्यांच्याकडून अशी अपेक्षा करण्याअैवजी ते आपल्यांत वावरताहेत, हसताहेत यांतच समाधान मानून घ्यायला नको का? मावळत्या सूर्यनारायणाने आपल्या तेजःकिरणांचा पसारा आवरता घेतला याबद्दल रागावतों का कधी आपण त्याच्यावर? अुलट, त्या सायंकालीन रम्य शोभेचें कौतुकच करतों.

तात्यांच्या लेखनांत लालित्य आणि कलासौष्ठव यांचा अभावच असे. लघुकथा, नाटक यांच्या वाटेला ते फारसे गेलेच नाहीत. कादंबऱ्या लिहिल्या त्यांतहि तंत्राचें सौंदर्य, कलेचा आविष्कार यांना कांहीच वाव मिळाला नाही. तात्यांची प्रतिभा तत्त्वज्ञानी, चिंतनशील आणि तर्काधिष्ठित अशी निदान मला तरी वाटते. त्यांच्या मननशील स्फूर्तीचा आविष्कार म्हणून या कादंबऱ्या चांगल्या झाल्या आहेत. त्यांतील विचारसौंदर्य अवर्णनीय व अमोल आहे. पण त्या कृति कादंबरी या दृष्टीने सरस वाटत नाहीत. आपले विचार लोकांपुढे ठेवण्याकरिता निर्माण केलेलीं पात्रें असें वाटतें. त्यापेक्षा त्यांनी सरळ लेखमाला लिहिल्या असत्या तर बरें झालें असतें. 'ज्ञान हें विष की अमृत' हा त्यांचा लेख सर्वोत्कृष्ट आहे. त्यांतील सडेतोड, मुद्देसूद विचारसरणी, ओघवती भाषा, कलात्मक मांडणी यांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे,

आमच्या निबंधाच्या बाबतींत तात्या म्हणायचे, "निबंधांचा कोणताहि भाग घ्या, तो कसा अेकजीव झालेला असावा त्या लेखाशीं. तो जर काढला किंवा मागेपुढे केला तर लागलीच निबंधाची शोभा कमी झाली पाहिजे. नाक जसें नाकाच्याच ठिकाणीं शोभून दिसतें तसेंच. नाहीतर तुमचे निबंध मागेपुढे करा नाही तर अजिबात काढून टाका, लेखावर त्याचा कांहीच परिणाम नाही."

तात्यांची हीच टीका आम्ही त्यांच्या कादंबऱ्यांवर अुलटवीत असूं. त्यांचीं चर्चात्मक प्रकरणें कादंबरींतून काढून टाकलीं काय किंवा मागेपुढे केलीं काय, कादंबरीची शोभा थोडीच अुणी व्हायची होती! यावर तात्या अगदी कबूल करायचे, "नाही बुवा आम्हांला तंत्राचें तंत्र सांभाळतां येत. तें फडक्यांनाच साधतें."

आमच्या टीकेने तात्या कधीच रागावत नसत आमच्यावर; अुलट त्यांना आमच्या निरीक्षणाचा आनंदच होअी. रागिणी कादंबरींतील मोठमोठीं चर्चात्मक प्रकरणें, तंत्रसौंदर्य व कलासौष्ठव यांचा अभाव, पांडित्यपूर्ण भाषा, अस्पष्ट व्यक्तिदर्शन, विस्कळित कथारचना इ०

दोष काढून दाखवायची आम्हांला फार हौस वाटे. तात्यांना आपल्या लेखनांतील दोषांची पूर्ण जाणीव होती, आणि त्याबद्दल ते स्वतः अुघडपणाने नेहमी बोलत. फडके, खांडेकर यांच्या बांधेसूद कथानकाची; कलापूर्ण व्यक्तिरेखनाची ते नेहमी स्तुति करीत. 'अिंदू काळे, सरला भोळे' शिकवितांना तर त्यांनी आपल्या लेखनांतील दोष अत्यंत मार्मिकतेने समीक्षण करून आमच्या नजरेला आणून दिले. आपल्या हातून व्हावी तितकी अनेकविध व विपुल वाङ्मयसेवा झाली नाही यात्रद्दल त्यांना नेहमी वाअीट वाटे. आपण केलें त्यानेच कृतकृत्य झाल्याचा आनंद त्यांनी कधीच मानला नाही. विद्यार्थिनींपेक्षा आपण खूप श्रेष्ठ आहोंत अशा समजुतीने त्यांनी आम्हाला कधीच शिकविलें नाही. आणि आम्ही त्यांना 'अतिशय श्रेष्ठ समजून स्वतःकडे गौणपणा घ्यावा अशीहि अपेक्षा त्यांनी कधी केली नाहीं. अुलट, आम्ही त्यांना अेकसारख्या शंका विचाराव्या, अुलटसुलट कोटिक्रम करावे आणि निरनिराळे प्रश्न अुपस्थित करून त्यांची मति कुंठित करावी अशी त्यांना आवड होती. बहुतेक विद्यार्थिनींची मतें घेतलीं तर त्यांत तात्यांची आंधळेपणाने विभूतिपूजा करणारी कोणीच निघणार नाही. कित्येक प्रसंगीं त्यांच्यांत व आमच्यांत मतभेद होअून त्यांच्या स्वभावदोषांची चर्चा आम्ही आपआपसांत केली असेल. परंतु वर्षाकालांतली हरितवर्णा, विपुलजला अशी पृथ्वी पाहून अुन्हाळ्यांतला भकास रखरखाट विसरून जातों, त्याप्रमाणे त्यांच्याशीं बोलतांना आमचा मतभेद आम्ही विसरून जात होतों. त्यांच्यावरील रागाची अढी मनांत राहतच नसे. खऱ्या जातिवंत रसिकाला कांट्यासहित गुलाबपुष्प आवडतें त्याप्रमाणे तात्या त्यांच्या दोषांसहित आम्हांला आवडत होते. कलंकरहित तेजाने त्यांचें व्यक्तिमत्त्व असह्य झालेलें नसून मानवी-दोषयुक्त छटांनी सुसह्य झालेलें होतें. आणि म्हणूनच त्यांच्यांत व विद्यार्थिनींत अेक अभिन्न आणि चिरकालीन असा स्नेहपाश निर्माण झाला आहे.

तात्या गेले तरी त्यांची स्मृति आमच्या मनांत नंदादीपासारखी तेवत राहील. त्यांच्या सहवासांत अितर कोणाला न लाभलेल्या अनुभवांचा जो ठेवा आम्हांला मिळाला, त्यांच्या व्यक्तित्वाचे जे ठसे आमच्यावर अुमटले, त्यांचे शिलालेख अविच्छिन्न स्वरूपांत जगाला दिसतील आणि तात्यांच्या स्मृतींच्या आनंदांत त्यांच्या मृत्यूची जाणीव मनाला होअून नेत्रांतील दोन अमोल अश्रुफुलें वाहून आम्ही त्यांच्या स्मृतिसमाधीची पूजा करूं.

---

## मराठी भाषेची पायमल्ली

लेο — ना. गो. चापेकर

स्वतःची भाषा शुद्ध लिहितां येत नाही ह्याची लाज कोणाला वाटत नाही. अिंग्रजी शब्दाचें स्पेलिंग चुकलें तर मात्र आम्ही खजील होतों. मुद्रणाच्या आड नामांकित ग्रंथकारांना लपतां येतें; परंतु ही आत्मवंचना फार काळ टिकण्यासारखी नाही. कारण मूळ हस्त-

अनुक्रमणिका

लेखच असंख्य चुकांनी भरलेला आढळेल. व्याकरणाचे नियम अवगत नाहीत व मराठी भाषेचा अभ्यास शास्त्रशुद्ध रीतीनें केला जात नाही हें ह्या आपत्तीचें खरें कारण आहे. शृंगाराचा शास्त्रीय पाया सुटल्यावर ज्याप्रमाणे शिमगा होतो, त्याप्रमाणेच आज मराठीची स्थिति झाली आहे. आजचें मराठी लेखन म्हणजे अज्ञानजन्य विद्वत्तेचें प्रदर्शन होय. दोषांचें समर्थन करणें हा वितंडवाद नव्हे तर काय?

प्रथमतः अनुच्चारित अनुस्वारांविरुद्ध बंडाचें निशाण फडकलें. त्याचा परिणाम न नरो वा न हरिः असें नृसिंह अवताराचें मोरोपंतांनी जें वर्णन केलें आहे त्याप्रमाणे झालेला अनुभवास येत आहे. अनुस्वार आवश्यक तेथे देत नाहीत आणि अनावश्यक तेथे देतात. ह्यावरूनच अनुच्चारित अनुस्वाराच्या ढालीमागे आपलें अज्ञान दडविण्याचा हा प्रयत्न आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही.

शाळाकॉलेजांत व्याकरण शिकविलें जात नाही असें दिसतें; म्हणून तज्जन्यदोष मोठेपणीं घडत असलेले आढळल्यास नवल नाही. विभक्तिप्रत्ययाच्या पूर्वी शब्दाचें सामान्यरूप होतें ह्याची जाणीव लेखकाना नाही. ह्यास्तव कविवर, शक्तिचा, व्यक्तिने, कसोटिने, बुद्धिला अशीं रूपें वर्तमानपत्रांत तशीच ग्रंथांत आढळतात. हें पाहिल्यावर वर्तमानपत्राच्या खुर्चीवर बसूं पाहणाऱ्या कॉलेज विद्यार्थ्यांने आत्मामध्ये, आत्माचें अशीं रूपें वापरल्यास त्यास हसण्याचें कारण नाही.

विद्यार्थिदशेमध्ये शुद्धलेखनाची दक्षता बाळगण्यांत येत नाही. अशुद्ध लेखन हें पास होण्यालाच नव्हे तर फर्स्ट क्लासांतहि येण्यास प्रतिबंधक होत नाही. ह्याचा परिणाम अशुद्धाला प्रतिष्ठा मिळवून देण्यांत होत आहे. मराठी भाषेला, ती शिकणारांना व शिकविणारांना हीनत्व चिकटलेलें दिसतें. संस्कृत झेपण्याची ज्यांची कुवत नाही ते विद्यार्थी बहुधा मराठी घेत असावेत. असे कनिष्ठ बुद्धीचे विद्यार्थी मराठी घेऊन अेम्.अे. होतात. पुढे हेच प्रोफेसर्स, ग्रंथकार, संपादक अशा विविध व्यवसायांत पडून आपल्याबरोबर त्या त्या व्यवसायांनाहि कमीपणा आणतात. कॉलेजमधल्या मुलांमुलींच्या लेखनाचा ज्याला अनुभव आहे त्यास वरील विधानाची सत्यता पटल्यावाचून राहणार नाही. त्यांच्या चुका अेकत्र केल्या तर अेक प्रचंड कोश तयार होअील; अुदा० निरीच्छय, प्रसीद्ध, निपीद्ध, स्फुर्ती, परीस्थिति, प्रिती, भीक्षा, मार्मीक, शीथिलता ह्या शब्दांत दोन ठिकाणीं दीर्घाच्या जागीं ऱ्हस्व अक्षर आलें असलें तरी ऱ्हस्वाअैवजी दीर्घ लेखनाचीं हीं अुदाहरणें होत. आतां ह्याच्या अुलट प्रकार पाहा: निति, नदि, स्त्रि, किचकवध, जिवन, पुजा, अिश्वर, तुं, विर वामनराव, तिन, नविन, दिर्घ अित्यादि.

संस्कृताच्या अध्ययनाची गरज नाही; त्याशिवाय मराठी भाषेचें ज्ञान प्राप्त करून घेतां येअील असें प्रतिपादणारांच्या डोळ्यांत कांही अशुद्धाचे प्रकार पाहिल्यावर चांगलेंच अंजन पडेल. संस्कृत शब्द लिहितांना कशी तारांबळ अुडते तें पाहा:—

अद्भुत = अभ्दुत, अन्तर्द्वंद्व = अंतःद्वंद्व, आधुनिक = अधुनिक, ग्रथित = ग्रथीत, चातुर्वर्ण्य = चातुर्वर्ण, अन्तर्मुख = अन्तरमुखी, पुनर्विवाह = पूर्नविवाह, अुद्गार = अुग्दार, अन्तश्चरित्र = अंतर्चरित्र, अुत्प्रेक्षा = अुत्पेक्षा, सौष्ठव = सोष्ठव्य, आर्द्रता = आद्रता, वर्म = व्वर्म, तीव्र = तीर्व, पुनः पुनः = पुन्हः पुन्हः, दृश्यकाव्य = दृष्यकाव्य, अतिशय = अतिषय,

परामर्श = परामर्ष, समावेश = समाविष, हृदय = ऱ्हदय, उद्दीपित = उद्दिप्ति, उद्देश = उद्येश, शूद्र = शुद्र, क्लेश = क्लेष, संरक्षण = सौंरक्षण, प्रतिस्पर्धी = परिस्पर्धी, श्लोक = स्लोक, प्रस्थ = प्रस्त.

ही यादी सहज वाढवितां येईल असें अनुमान करण्यास इतकी शब्दसंख्या पुरे आहे.

व्याकरणाचीं मूलतत्त्वें ज्यास अवगत आहेत त्याच्या हातून मूळाशीं असें स्वरूप लिहिलें जाणार नाही. परंतु बी. ए. होणारे विद्यार्थी असें लिहितात ह्यांत मात्र संशय नाही. मूळ ह्यांतील मू दीर्घ आहे तेव्हा विभक्तीनंतरहि तो दीर्घच राहणार ही समजूत ! कांही विद्यार्थी क्लिष्टच्या पाठीमागे अ लावून अक्लिष्ट शब्द क्लिष्ट ह्या अर्थी वापरतात. अपरोक्ष, अचपल ह्यांचें हें नवसंपादित भांडवल. अ व आ ह्यांतील भेद न समजल्यामुळे आस्वाद्य ह्याच्याऐवजी अस्वाद्य शब्द लिहिला जातो व अदोषी पाहिजे तेथें आदोषी लिहिण्यांत येतें.

विद्यार्थी म्हणून ही उपेक्षणीय गोष्ट आहे असें म्हणणें आत्मघातकीपणाचें होईल. अशा उपेक्षेमुळेच केसरीसारख्या वर्तमानपत्रांतील शुद्धलेखन बिघडत चाललें आहे. एका कवितेला 'साफल्यता' हा मथळा दिलेला वाचल्याचें स्मरतें. हास्यरसाची ही बहीण ! केसरींत साफल्यतेला मान्यता मिळाल्यावर विद्यार्थिदशेचा उंबरठा न ओलांडलेल्यांनी सौकुमार्यता शब्दाला जन्म दिल्यास आश्चर्य मानण्याचें कारण नाही.

केसरी इकारान्त असल्यामुळे फसून जाऊन ती केसरी असा स्त्रीलिंगी प्रयोग पूर्वी करीत असत. तो काल गेला नाही असें बजावण्यासाठीच की काय 'काव्याचें लक्षण ध्वनि मानली' असें लिहिलेलें आजहि वाचावयास मिळतें.

बी.ए. होणाऱ्यांनी अन्तकरणांत, अन्तस्वरूप, अंतर्परीक्षण, बहीर्परीक्षण, काव्योत्कर्षाला, ग्रहस्थ, बिवरण, बीवत्स अशा नमुन्याचें शब्दलेखन केलें म्हणजे मराठी भाषेची अवस्था पुढे काय होईल ह्याचा विचार जबाबदार लेखकांनी करावयास पाहिजे.

'नव्हे'बद्दल 'नवे' लिहिल्यानंतर तत्त्व व महत्त्व ह्यांत द्वित्त त नसतो म्हणून कुरकुर करण्याचें धाडस कोण करील ?

श, ज हीं अक्षरें अंतीं असलेल्या शब्दांचें सामान्यरूप होत नाही हें माहीत नसल्यामुळे 'पुष्कळश्या-अश्या तत्त्वांवर' अशा प्रकारचें अशुद्ध लिखाण लेखणींतून उतरतें.

आहे व नाही ह्या क्रियापदांचें अनेकवचन न करण्याची एक नवीन प्रवृत्ति दिसून येते; उदा० 'माणसें भुकेने मरत आहे'; 'ते गेले नाही' असे वाक्यप्रयोग आता रूढ होऊं पाहतात. ह्या वाक्यांतील होऊं शब्दावर अनुस्वार देण्याची आवश्यकता कोणास वाटत नाही. ह्यास्तव 'तो बोलू देतो'; 'वासरूं मरू लागलें'; 'तो तें काम करू पाहतो' अशीं वाक्यें वाचण्याचा प्रसंग येतो.

हें अशुद्ध लेखन अगर लेखनांतील ही बंडाळी चव्हाट्यावर आणणें सध्या इष्ट आहे.

# महाराष्ट्र-रंगभूमि-शताब्द-महोत्सव



लें०— बापूराव शिवराम नाशीक

गेलें अेक वर्ष बृहन्महाराष्ट्रांत ग्वाल्हेरपासून दक्षिण कोंकणांतील वेंगुर्ल्यापर्यंत आणि मुंबअीपासून नागपूरपर्यंत नाट्यकलेच्या दुंदुभि दुमदुमत आहेत. जागतिक युद्ध, सार्वत्रिक महर्घता, अुत्पात, अुपासमार, धरपकड अशा अनेकविध आपत्ति नित्य येत असतांहि महाराष्ट्रांत जो दुर्दम्य अुत्साह व अलोट नाट्यप्रेम दिसून आलें त्यास अन्यत्र तोड नाही. प्रतिकूल परिस्थितींत ही स्थिति तर अनुकूल परिस्थितींत या महोत्सवास काय प्रचंड स्वरूप आलें असतें याची कल्पनाच करावी. कांहीं व्यवहारतत्पर लोकांनीं देशाला आग लागली असतां हें महाराष्ट्रानें काय चालविलें आहे असा आक्रोश करावयास कमी केलें नाही. साहित्यसम्राट् केळकरांनीं या आक्षेपास पुण्यास अुत्सव-योजना करण्यासाठी भरलेल्या सभेंत अुत्तर दिलेंच आहे.

१९४० मध्ये नाशकास भरलेल्या संमेलनांत अुत्सवाची कल्पना निघाली. तिला मूर्तस्वरूप देण्यासाठी "१८४३ सालीं सांगलीस राजाज्ञेवरून विष्णुदास भावे यांनी केलेल्या सीतास्वयंवर नाटकास १०० वर्षे होतात. त्यानिमित्त शतसांवत्सरिक अुत्सव महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं साजरा करावा" असा मुंबअीस १९४१ सालीं भरलेल्या नाट्यसंमेलनांत ठराव झाला. शुद्ध अैतिहासिक दृष्टीनें पाहिलें तर महाराष्ट्र नाट्यकलेस शंभरच काय, पण दोन-अडीचशेहून जास्त वर्षे झालीं आहेत. अि. स. १६९० मध्ये लक्ष्मीनारायणकल्याण नाटक लिहिलें गेलें. शिवाय अितरहि ३०–३५ नाटकें तंजावरच्या नाट्यप्रेमी राजांनी लिहिलीं तीं अुपलब्ध आहेत. तंजावरास रंगपीठ असून तेथे नाटकें होत असत. हीं नाटकें द्राविडी व मराठी अशा दोन्ही भाषांत लिहिलेलीं आहेत, व त्यांतील ताल, राग, रचना नाट्यशास्त्रोक्त पद्धतीहून भिन्न आहेत. म्हणून त्यांची गणना महाराष्ट्र रंगभूमीच्या अितिहासांत करावयाची नाही म्हटलें तरी २–३ शे वर्षे कोंकणांत दशावतारी नाटकें प्रतिवर्षी होत आहेत तीं हिशेबांत घ्यावींच लागतील. हीं कोंकणी दशावतारी नाटकें नाट्यगुणांमध्ये किंवा तंत्रविकासामध्ये भावे यांनी पुढे देशावर लोकप्रिय केलेल्या नाटकांहून मुळीच मागासलेलीं नाहीत. भावे यांनी कर्नाटकी खेळे पाहिले ती वस्तुतः ह्या कोंकणी दशावताराचीच कर्नाटकी नक्कल होती. कारण कर्नाटकांतील यक्षगान हें भावेप्रणीत पौराणिक किंवा कोंकणी नाटकांहून मूलतःच भिन्न आहे.

घाटांतून प्रवास करतांना रस्त्याच्या नागमोडी स्वरूपामुळे अेका विवक्षित मागापुढे मागील रस्ता जसा दिसत नाही, तसेंच सामान्य जुनांच्या अैतिहासिक ज्ञानाचें असतें. आणि म्हणून जेथवर स्पष्ट माहिती मिळते तेथपासूनच नाट्यमहोत्सवार्थ वर्षगणना करतात. अुद्या कोंकणांत अमुक अेका तारखेस अमुक अेका देवळांत दशावतारी नाटक झालें असा निश्चित पुरावा सांपडला म्हणजे कदाचित् पुढील दशकांतहि आपणाला महाराष्ट्र नाट्यकलेचा पंचशत-वार्षिक महोत्सव करावा लागेल. या संभवांत मला मुळीच अशक्यता वाटत नाही. फेब्रुवारी







१९४३ मध्ये पडघवली येथे श्री. वामनराव पुरोहित यांच्या अध्यक्षतेखाली झालेला अुत्सव सोलापुरांतील अुत्सव आणि पुण्यांतील सोशल क्लबांत झालेला अुत्सव असे अेकदोन अपवाद सोडले असतां महाराष्ट्रांतील नाट्यमहोत्सवांस १९४३ च्या नोव्हेंबराच्या पहिल्या आठवड्यांत सांगलीस झालेल्या अुत्सवापासून सुरवात झाली असें म्हणतां येअील. सांगलीचा अुत्सव प्रचंड मंडपांत सुमारें ७००० प्रेक्षकांच्या साक्षीने साजरा झाला त्याला मुंबअी अुत्सवाशिवाय तोड नाही. सांगलीस अुपस्थित झालेल्या नाट्यरसिकांचें कलाप्रेम अितकें जाज्वल्य होतें की महोत्सव सुरू होण्यापूर्वी गॅलरी कोसळून अनेक माणसें जखमी झालीं असतांहि अर्ध्या तासांत महोत्सवास सुरवात झाली. पूर्वरात्रीं पाअूस पडून मंडपांत गुडघाभर चिखल झाला होता तरीहि तेथील तज्ज्ञ स्थापत्यविशारद (कै. विष्णुदास भाव्यांचे नातू) रावसाहेब भावे यांनी अेका रात्रींत मंडपांत सुमारें दोनशें गाड्या वाळू टाकून बाहेरगांवाहून आलेल्या पाहुण्यांचा विरस होअू नये म्हणून कमालीची मेहनत घेतली. सांगलीच्या कार्यकर्त्यांकडून कांही– नव्हे पुष्कळ– चुका अनभिज्ञतेमुळे किंवा अजाणतेपणामुळे झाल्या असतील. परंतु पाहुण्यांनी– विशेषतः वृत्तपत्रांनी– त्याजविषयीं जास्त सहिष्णुता दाखविली पाहिजे होती असें म्हटल्यावांचून राहवत नाही. सांगलीच्या अुत्सवास अपेक्षेपेक्षा जास्त प्रतिनिधि आले म्हणून व्यवस्थापक मंडळीने तक्रार केली. अखिल महाराष्ट्राचा म्हणून हा अुत्सव झाला त्यांत पुणें-नाशिक-मुंबअीहून २००–३०० प्रतिनिधि म्हणजे कांही फार झाले नाहीत; आणि ते पूर्वदिवशीं आले होते. त्यांस जर जागा नव्हती तर अुत्सव सुरू झाल्यावरहि सकाळीं तिकीटें विकलीं जातच होतीं ना? परिषदेचे अध्यक्ष प्रा. दत्तोपंत पोतदार, प्रसिद्ध साहित्यिक वि. स. खांडेकर, नाट्यतपस्वी मामा वरेरकर, खुद्द नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष श्री. नानासाहेब कुलकर्णी यांच्यासारख्यास जागा मिळाली नाही म्हणून रंगमंचावर बाजूस अुभें राहावें लागलें तर वेंगुर्ल्यासारख्या लांबच्या पल्ल्याहून आलेल्या व पूर्वी दोन महिने प्रतिनिधि झालेल्या श्री. कुळकरांसारख्यास मंडपांत प्रवेशहि मिळाला नाही ही गोष्ट व्यवस्थापकांस मुळीच भूषणावह नाही. सांगलीच्या व्यवस्थापकांनी अनेक वेळां दिलगिरी प्रदर्शित केली आहे. पण ह्या मागच्या घटनेवरून पुढच्यांनी आता शहाणें झालें पाहिजे!

पुणें-ग्वाल्हेर-मुंबअी येथील व्यवस्था जास्त चांगली होती. मुंबअीस ५०००–७००० समुदाय असूनहि बसण्याच्या व्यवस्थेंत जराहि कमतरता झाली नाही. मात्र शेवटच्या खुर्च्या लांब १५० फुटांवर असल्यामुळे दृष्टिसुखांमध्ये कमतरता आली परंतु मागचें तिकीट घेअून पुढील रांगांतल्याप्रमाणे दिसावें अशी अपेक्षाच करणें चूक नाही काय? शिवाय सौभद्राचा पहिला अंक सोडला तर दूरध्वनिक्षेपक अितकें सुंदर काम देत होते की प्रत्यक्ष मानवी आवाजच अैकतों असें वाटावें. कोल्हापुरासहि चांगली व्यवस्था झाली. नाशकास सर्व कार्यक्रम थिअेटरांत झाल्यामुळे बऱ्याच प्रेक्षकांची निराशा झाली.

ठिकठिकाणीं झालेल्या अुत्सवांत स्वा. सावरकर, साहित्यसम्राट् केळकर, नाट्यतपस्वी वरेरकर, संगीततज्ज्ञ गोविंदरावजी टेंबे, नटसम्राट् बालगंधर्व, नटवर्य दाते, नाटककार नारायणराव कुलकर्णी, प्रा. बनहट्टी अित्यादि विद्वान् अध्यक्षांनी केलेल्या अध्यक्षीय भाषणामुळे नाट्यविषयक वाङ्मयांत् चांगली भर पडली आहे यांत संशय नाही.

श्री. सावरकरांचें सांगलीचें भाषण अैकून त्यांनी अध्यक्षपदीं निवड झाल्यावर घाअीघाअीने २–४ पुस्तकें पाहून अैतिहासिक माहिती जमा केली आहे असें वाटलें, तर चित्रपट

ही नाट्यकलेची प्रगति आहे हा त्यांचा सिद्धान्त अगदी हास्यास्पद वाटला. तो सुप्रसिद्ध नाट्यतपस्वी श्री. गोविंदरावजी टेंबे यांनी नागपूरच्या अध्यक्षीय भाषणांत खोडून काढला आहे. अेखाद्या व्यक्तीस अन्य क्षेत्रांतील प्रभावी कामगिरीमुळे तीस अपरिचित क्षेत्रांत मोठेपणा दिला तर कसा अनवस्था प्रसंग येतो तो येथे दिसून आला! नाट्यमहोत्सवाचें अध्यक्षपद केवळ नट वा नाटककार यांनाच फक्त द्यावें असें अर्थात् म्हणणें नाही. रसिक प्रेक्षक हा अेक महत्त्वाचा घटक नाट्यकलोपासनेंत आहे व त्या दृष्टीने अेखाद्या सन्मान्य नागरिकास अध्यक्षपद देण्यास हरकत नसावी.

श्री. मामासाहेब वरेरकरांचीं सर्वच भाषणें अत्यंत कळकळीचीं व आवेशपूर्ण अशीं झालीं. मराठी रंगभूमीची अवनतीची त्यांची मीमांसा सामान्यपणें मान्य होण्यासारखी आहे. संगीतावरील त्यांचा आक्षेप अतिशयोक्त वाटला तरी रागदारीचें संगीत रंगभूमीवर आल्यामुळे रसोत्कर्ष व्हावयाच्या अैवजी अपकर्षच होअूं लागला व प्रेक्षक नाटकासाठी न जातां केवळ जलशासाठी जाअूं लागले हें स्पष्ट आहे. वन्स मोअर सारखे अनिष्ट प्रकार यामुळेच सुरू झाले.

स्त्रियांचीं कामें स्त्रियांनीच करावीं हें मत साताऱ्याचे अध्यक्ष प्रा. माटे सोडले तर सर्वांनीच प्रतिपादलें. स्वा. सावरकर यांनी सांगलीस कुलीन स्त्रियांनी नाटकांत कामें करूं नयेत हें म्हणणें कसें अयुक्त व हास्यास्पद आहे हें सप्रमाण दाखविलें. श्री. मामा वरेरकर व गोविंदरावजी टेंबे हे तर स्त्रियांचीं कामें स्त्रियांनीच करावीं असें पूर्वीपासून म्हणणारे. परंतु स्त्रियांनी नाटकांत कामें करण्याच्या विरुद्ध समजले जाणारे डॉ. मडकमकर व श्री तात्यासाहेब केळकर यांनी मात्र आपल्या अनुयायांचा 'विश्वासघात' (?) केला. पुण्यास, नगरास व नाशिकास सुपरिनिर्दिष्ट समाजधुरीणांनी केलेल्या भाषणांत त्यांनी स्त्रियांना कामें करावयास अनुमति दिली. तात्यासाहेबांनी अेक सुंदर अुपमा देअून कुलीन स्त्रीने नाटकांत भूमिकेशीं तादात्म्य पाअून रसोत्कर्षास आवश्यक तो अभिनय करण्यास आक्षेप कां असावा व त्यानंतर तिचें शील बिघडेल अशी शंका कां प्रदर्शित केली जावी असा सवाल केला आहे. याच्याहि पुढे जाअून श्री. केळकरांनी "नाटक हा धंदा आहे व कोणताहि धंदा पवित्र आहे...कुलीन स्त्रीने सहसा नाटकांत जाअूं नये; पण अेखादी गेलीच तर तिला नांवें ठेअूं नयेत व अकुलीन ठरवूं नये, आपल्या नीतीच्या व शीलाच्या कवचाचा जिला विश्वास वाटत असेल तिने नाटकांत जावें"* असें प्रतिपादलें आहे.

श्री. नारायणराव कुलकर्णी, श्री. बा. मो. कानिटकर यांनी ठिकठिकाणीं नाटकगृहें असावींत असें प्रतिपादलें. म्युनिसिपालट्या व सरकार यांनी नाट्यखातें चालविलें पाहिजे यावर आपल्या सर्वच संभाषणांत वरेरकर यांनी भर दिला आहे. नगर येथे अुत्सवांतच नाट्यमंदिराचा पाया घातला गेला व तें नाट्यमंदिर आता तयार होतहि आलें आहे. मध्यवर्ती अुत्सव मंडळाच्या कार्यकारिणीचे अेक सदस्य श्री. चिन्तामणराव कोल्हटकर यांच्या प्रेरणेने पुण्यांतहि केवळ नाटकांसाठीच म्हणून अेक नाट्यगृह बांधलें जात आहे.

श्री. बालगंधर्व यांनी मुंबअीस केलेल्या अध्यक्षीय भाषणांत नटांची कैफियत जोरदारपणें मांडली. संगीत नाटकांच्या संप्रदायामुळे नाट्यकला अवनत दशेस गेली हें म्हणणें विशेषतः गंधर्व कंपनीच्या नाटकास अुद्देशून होतें. त्याबद्दल त्यांनी आपलें समर्थन केलें. करमणूक म्हणूनच केवळ नाटकांकडे पाहिलें तर गंधर्वांचें समर्थन पटण्यास हरकत नाही.

* नगर येथील भाषण—चित्रमयजगत्, जून १९४४.

परंतु नाट्यकलेच्या अुत्कर्षास संगीताचें नाटकांतील प्राचुर्य आड आलें व प्रेक्षकांची रुचि बिघडली हें अमान्य करतां येणार नाही. जुने नाटककार दमले व नवे पुढे आले नाहीत हें गंधर्वांचें म्हणणें खरें आहे. पण त्यास नाटक मंडळयाच जबाबदार नाहीत काय ?

या अुत्सवांत जीं नाटकें झालीं त्यांवरून महाराष्ट्र नाट्यरसिकांची नाट्याभिरुचि पुनः अेकदा व्यक्त झाली. शारदा, सौभद्र, संशयकल्लोळ, अेकच प्याला, मृच्छकटिक हीं संगीत नाटकें आणि वेबंदशाही, भाअुबंदकी, हॅम्लेट हीं गद्य नाटकें प्रेक्षकांच्या अत्यंत आवडीचीं होतीं. पुष्कळशा प्रथितयश व नामवंत नटांनी अुत्सवांत सहकार्य केलें. परंतु अितर नटांनी या अुत्सवांत दाखवलेली वृत्ति मुळीच चांगली नव्हती. अुत्सव हा आपला होतो आहे व म्हणून अुत्सव करण्यास निघालेल्या लोकांनी आपल्यास सन्मानानें नेअून अुत्सवमूर्तीचें स्थान द्यावें अशी बहुतेक नटांची अिच्छा दिसली. ते पृच्छा करीत तुम्ही बेकार नटांचें काय करणार आहांत ? ते अेक गोष्ट पार विसरले होते की गेल्या अनेक वर्षांत ज्यांनी नाट्यकलेवर पोट भरलें त्यांनीच वस्तुतः हा अुत्सव करण्यास पुढे आलें पाहिजे होतें. श्री. दाते व श्री. वामनराव पुरोहित यांनी नटांकरिता काढलेल्या पत्रकाचाहि अपेक्षेप्रमाणे अुपयोग होअू शकला नाही ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

सांगलीच्या शारदेंतील श्री. चिंतुबुवा गुरवांचें भुजंगनाथाचें काम, पुण्याच्या शारदेंतील बोडसांचें कांचनभटाचें काम आणि मुंबअीच्या शारदेंतील वासंतीचें शारदेचें काम हीं कामें अविस्मरणीयच झालीं. मुंबअीस श्री. पटवर्धनबुवांनी स्वयंवर व अेकच प्याल्यांत अनुक्रमें भीष्मक व रामलाल या भूमिका संगीत व अभिनय या दृष्टीनें अुत्कृष्ट वठविल्या. स्वयंवरांत 'जा भय न मम' ह्या मालकंसाच्या वेळीं वरच्या सप्तकांतील धैवत लावल्याबरोबर ७००० प्रेक्षकांनी हर्षोत्फुल्ल होअून टाळयांचा कडकडाट केला. नाशिक येथे श्री. पटवर्धनबुवांनी आश्विनशेटचें काम केलें. त्याबद्दल त्यांस त्यांचे गुरु श्री. गणपतराव बोडस यांनी शाबासकी दिली व बालगंधर्वहि म्हणाले की "देवा ! कमाल केलीत". सौभद्रांत सौ. हिराबाअी बडोदेकरांनी व अेकच प्याला व स्वयंवरांत श्री. बालगंधर्वांनी संगीताची मेजवानीच दिली. श्री. लोंढे यांचें पुण्यांतील मानापमानांतील धैर्यधराचें काम अुत्तम झालें. त्यांनी कोदंडाची भूमिका सर्वत्र ठाकठीक केली. भाअुबंदकी नाटकांत श्री. नानासाहेब फाटक व सौ. पद्मावती वर्तक यांनी चांगलीं कामें केलीं. श्री. केशवराव दाते यांचा तुळोजीच्या कामांतील मुद्राभिनय अुत्कृष्ट झाला. श्री. चिन्तामणराव कोल्हटकरांच्या सन्यस्त खड्गांतील शस्त्रग्रहणाचा प्रवेश व पुण्यास श्री. मामा भटांचा मॅक्बेथमधील खुनाचा प्रवेश ह्यांनी जुन्या नटांचें अभिनयकौशल्य चांगलें व्यक्त झालें. कोल्हापुरास संशयकल्लोळांतील सरोज बोरकरांच्या कृत्तिकेच्या कामाची सर्वत्र स्तुति झाली आहे. मुंबअीस साहित्यिकांनी वेड्यांचें बाजार नाटक केलें तर अुमरावतीस प्रो. कोलते यांनी भादव्याचें काम हौसेनें केलें.

या अुत्सवांत जीं आधुनिक नाटकें झालीं तीं मात्र व्हावीं तितकीं चांगलीं झालीं नाहीत. सांगलीचें 'पूर्वग्रह' व 'शस्त्रसंन्यास' व पुण्याचें 'पांघरलेली कातडीं' ह्या नाटकांतच तीं विशेष आकर्षक वाटावीं असा नाट्यगुण नव्हता. व त्यांचे प्रयोगहि विशेष चांगले झाले नाहीत. कोल्हापूरचें 'नवीन कल्पना' व मुंबअीचे 'जन्माचे सोबती' हे प्रयोग चांगले झाले. 'जन्माचे सोबती'मध्ये बालनट व सौ. शोभना अिंगळे, सौ. नलिनी ढेरे यांचीं कामें चांगलीं झालीं. आधुनिक नाटकांसंबंधी अेक गोष्ट सांगावीशी वाटते ती ही की नवीन प्रवृत्तीचें बीजारोपण करतांना त्याच्या मागे असणाऱ्यांनी विशेष काळजी घेतली पाहिजे. कारण सर्व-

साधारण प्रेक्षकवर्ग असलीं नाटकें पाहून तुमचें नवें तंत्र तें हेंच काय असें विचारतो त्या वेळीं निरुत्तर व्हावें लागतें ! मुंबअी संमेलनांत श्री. के. नारायण काळे यांनी घरकुल नाटकाचा प्रयोग केला, त्यानंतर तसा प्रयोग पुनः झालेला दिसत नाही. महोत्सवाच्या चालकांनी आता आधुनिक धर्तीचीं व त्यांत समाजांतील जिव्हाळ्याचे प्रचलित प्रश्न आणले आहेत अशीं नाटकें करण्याचा प्रयत्न करावा म्हणजे या महोत्सवाने प्रेक्षकांच्या अुत्साहांस जी भरती आली आहे तिचा योग्य अुपयोग केला असें होअील.

या महोत्सवाची फलश्रुति काय असा प्रश्न अनेक लोक विचारतात. मुंबअीस १९४१ मध्ये नाट्यसंमेलन झालें त्यानंतर गेल्या तीन वर्षांत महाराष्ट्र नाट्यकलाप्रेमास जी भरती आली आहे ती यामुळेच होय. नामवंत व अुद्योगी नटांनी कामें केलेलीं नाटकें– जुनीं नाटकें– पाहावयास आजहि प्रेक्षक अुत्सुक आहेत हें स्पष्ट झालें. प्रसिद्ध नटांनी अेकत्र केलेलीं नाटकें अुत्सवांत करण्याची यशस्वी कल्पना काढणारे श्री. वामनराव पुरोहित, डॉ. मालेराव यांचा अवश्य अुल्लेख व्हावयास हवा. कारण हीं नाटकें घडवून आणणें फारच कठीण काम आहे.

असे नट अेकत्र येणें, नाटकमंडळ्यांच्या वृत्तीमुळे व नटांच्या दुराग्रहामुळे दुर्घट झालें. त्याचमुळे महाराष्ट्र रंगभूमि धंदा म्हणून मेली. ठिकठिकाणच्या नाट्यप्रेमी कार्यकर्त्यांचा परस्पर-संबंध आला व त्यांच्या कार्यवृत्तीस अेक विशिष्ट वळण लागलें याचें श्रेय नाट्यमहोत्सवास दिलें पाहिजे. महाराष्ट्रांतील अेका निवृत्त नाट्यतपस्वी नट-नाटककाराचें म्हणणें असें आहे की महोत्सवामुळे सामान्य जनांत अेक प्रकारची कृतार्थता येते व त्यामुळे नाट्यकलेविषयी काही कर्तव्य आहे हें विसरलें जातें व ते अुदासीन होतात. ही भीति खोटी ठरविण्यासाठी महाराष्ट्र नाट्यरसिकांच्या अुत्साहास आलेल्या भरतीचा योग्य तो अुपयोग वेळींच करून घेतला पाहिजे.

---

## परिषद्वार्ता

( चिटणीसांकडून )

म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा ता. ३-६-४१ रोजीं परिषदेच्या कार्यालयांत परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली भरली. सोळा सभासद अुपस्थित होते. सभेंत झालेल्या कामाचा सारांश पुढीलप्रमाणे– मागील सभांचे वृत्तान्त संमत झाले. पुढील साहित्यिकांच्या निधनाबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले. दि. ब. कृ. ल. पावणसकर, श्री. के. ल. टेंबुर्णीकर, श्री. शं. पु. जोशी, डॉ. खिरवडकर, श्री. वासुकाका जोशी; श्री. वि. रा. शिंदे, श्री. पु. ग. नानल, श्री. शं. न. जोशी, श्री. दादासाहेब फाळके, श्री. श्रीपतराव शिंदे, श्री. ना. वि. आपटे, श्री. धराधर, श्री. वि. गो. गोखले, रा. ब. धुरंधर, श्री. दत्तोपंत आपटे, सर खासेरावसाहेब पवार. इचलकरंजीकर श्रीमंत बाबासाहेब घोरपडे व प्रा. वा. म. जोशी यांच्याबद्दल स्वतंत्र ठराव करण्यांत आले.

१९४३ सालचा हिशेब व जमाखर्च व १९४४ चें अंदाजपत्रक संमत करण्यांत आलें ज्या संलग्न संस्थांची वर्गणी तीन वर्षेपर्यंतची आली नव्हती त्या संस्थांचीं नांवें कमी करण्यांत

आली. सांगली संमेलनांत पास झालेल्या संमेलन-परिषद्-अेकात्मतेच्या ठरावाच्या अंमलबजावणीसंबंधी चर्चा होअून पुढील ठराव अेकमताने पास झाला. "परिषदेच्या प्रादेशिक सभासदांची संख्या अद्यापि पुरेशी नाही व आहे तीहि प्रादेशिक विभागदृष्ट्या अत्यंत विषम आहे तसेंच अेक हजार सभासद व्हावे ही अपेक्षा पूर्ण झालेली नाही. ही परिस्थिति विचारांत घेतां संरनाम्यांतील साध्य सिद्ध होण्यास अनुकूल अशी पूर्वतयारी झालेली नाही असें या सभेचें मत आहे. व त्याप्रमाणे या सभेची शिफारस साधारण सभेकडे आहे."

पटवर्धन साहित्य मंदिर माडयाने देण्याबद्दल थोडीशी चर्चा होअून तो ठराव कार्यकारी मंडळाकडे अभिप्रायार्थ पाठविण्यांत आला.

कार्यकारी मंडळाच्या सभा ता. २१ जून १९४४, ता. ५ जुलै १९४४ व २१ जुलै १९४४ रोजीं भरल्या होत्या. या सभांतून प्रामुख्याने परिषदेच्या ट्रस्टसंबंधींचा विचार झाला. परीक्षासमितीने तयार केल्याप्रमाणे 'आचार्य' परीक्षेच्या अभ्यासक्रमाला मान्यता देण्यांत येअून पहिली आचार्य परीक्षा १९४६ सालीं घेण्यांत यावी असें ठरलें. कादंबरीकार कै. ह. ना. आपटे यांच्या सुशील पत्नी श्री. रमाबाअी आपटे यांच्यासंबंधीचा दुखवट्याचा ठराव झाला.

सांगली संमेलनांत संमत झालेल्या ठ. १० प्रमाणे अनिष्ट लेखनास प्रतिबंध व्हावा या हेतूने मार्गदर्शन करण्यासाठी प्रा. श्री. म. माटे यांच्या अध्यक्षतेखाली जी समिति सुचविली होती तिला अेक वर्षापुरती मान्यता देण्यांत आली. त्या समितीचें काम सुरू आहे.

**परिभाषा-चर्चा-मंडळ**—मंडळाच्या वतीनें "शैक्षणिक मानसशास्त्र व शिक्षणशास्त्र" या विषयाची परिभाषा तयार झाली असून ती पुस्तिकेच्या स्वरूपांत छापली आहे. तीन आणे किंमतीचीं तिकिटें पाठविणारास ती पुस्तिका मिळेल.

**परीक्षावर्ग**— प्राज्ञ व विशारद या परीक्षांसाठी वर्ग नियमित सुरू झाले. विद्यार्थ्यांची संख्या बरीच आहे.

**स्वाध्यायमंडळ**— या मंडळाच्या व्याख्यानमालेचें अुद्घाटन प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ डॉ. प. ल. वैद्य यांच्या हस्तें झालें. त्यांनी "मराठी भाषेचे झरे" या विषयावर अत्यंत अुद्बोधक व्याख्यान दिलें. दुसरें व्याख्यान हिंदी प्रचार समितीचे प्रमुख श्री. गो. प. नेने, बी.अे. यांचें "हिंदी-मराठीचें वाङ्मयीन साम्य" या विषयावर झालें. दर शनिवारीं मंडळातर्फे व्याख्यानांचा कार्यक्रम आंखला आहे.

## नवीन सभासद

**तहाहयात**— (साधारणांकडून) सौ. शकुंतला देवधर, नागपूर; श्री. गणेश वामन जोशी, पुणें. **साधारण**— श्री. म. के. अनगळ, पुणें; श्री. वा. ल. चिपळूणकर, पुणें; सौ. कमळाबाअी चितळे. मुंबअी— प्रा. रं. रा. देशपांडे, श्री. एस्. बाबू नारायण अंधृटकर, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर. श्री. वि. श्रा. चौधरी, सांगवी बुद्रुक (पू. खानदेश). श्री. श्री. दा. पंडित, कोईमतूर. श्री. दे. द. मोहनपूरकर, नांदेड (निजाम). श्री. के. कौ. पाटील, भुसावळ. श्री. से. श्री. पगडी, सिंधपूर. श्री. ग. चिं. जोशी, जुन्नर. एस्. व्हीं. काटी, गुलबर्गा. श्री. वि. ब. जोगी, अजमीर.

---

# संपादकीय

कागदनियंत्रणासंबंधी सरकारने काढलेल्या सर्वंकष शासनामुळे अितर नियतकालिकां- प्रमाणे म. सा. पत्रिकेवरहि अनपेक्षित व अपरिहार्य असें बंधन पडलें आहे. पत्रिकेच्या या अंकाचें स्वरूप त्यामुळेच सर्वस्वीं ठरून गेलें. मराठीचा साहित्यसंसार, बृहन्महाराष्ट्रीय साहित्य- वार्ता, भाषाभगिनींचा साहित्यसंसार हीं सदरें तर कमी करावीं लागलींच, पण पत्रिकेचा परीक्षणविभागहि या अंकापुरता स्थगित करावा लागला आहे. पूर्वनियोजित आणि पुढे टाकतां न येण्याजोग्या अशा लेखनाने सारी स्थलमर्यादा आक्रमिल्यामुळे अुपाय अुरला नाही. परिषद्वार्ता आणि संपादकीय यांवरहि क्रमप्राप्त असा आकुंचनाचा प्रसंग आला आहे. पत्रिकेचा आणि परिषदेचा यावर कांहीं अुपाय करण्याचा प्रयत्न चालू आहे. त्यांत किती यश मिळतें तें पुढील अंकापर्यंत कळेल. तोंवर पत्रिकेचे वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

× × ×

वऱ्हाडमधील यवतमाळचे श्री. यशवंत खुशाल देशपांडे या वाङ्मयसेवकाचा अेकसष्टी- चा समारंभ नुकताच साजरा झाला. आपल्या 'शारदाश्रमा'च्या विद्यमानें जुन्या महानुभाव- वाङ्मयाच्या अुद्धाराचें कार्य त्यांनी सतत अनेक वर्षें केलें आहे. प्रसिद्धीची फारशी आशा नसतांना महत्त्वाचें असें वाङ्मयकार्य करणाऱ्या या साहित्यिकाचा विदर्भवासीयांनी गौरव केला ही गोष्ट अत्यंत अुचित अशीच झाली. श्री. देशपांडे हे मराठी वाङ्मयाचा अिंग्रजीमध्ये अेक अितिहास नव्याने लिहीत आहेत. असा अेखादा चांगला ग्रंथ निर्माण होणें फार आव- श्यक होतें. अिंग्लंडमध्ये अुपलब्ध झालेल्या काही माहितीचा अुपयोग ते यांत करणार आहेत. काम मोठें आहे; तें समग्र पार पाडण्यास आवश्यक तें आयुरारोग्य त्यांना मिळावें अशी आम्ही प्रार्थना करतों.

× × ×

विदर्भामधील जनता याप्रमाणे वाङ्मयविषयक आपलें कर्तव्य बजावीत असतां तेथील राज्यसंस्थेने मात्र मराठीसंबंधी प्रतिकूल धोरण स्वीकारावें ही गोष्ट शोचनीय आहे. नागपूरच्या सरकारी कॉलेजमधील खालचे दोन वर्षांचे वर्ग बंद करणें व विद्यापीठाकडून लिहून आल्यावर या वर्षापुरतेच चालू ठेवणें, पटवर्धन हायस्कूलमध्ये पांचवीच्यापुढे मराठी माध्यमाचे वर्ग बंद करणें, वऱ्हाडशालापत्रकाची देणगी बंद करणें या गोष्टी अेकसमयावच्छेदें होत असल्याने ही मराठीविरुद्धच सरकारची मोहीम सुरू आहे असा साहजिकच निष्कर्ष काढावासा वाटतो. हा निष्कर्ष खरा असल्यास त्याचा जेवढा निषेध करावा तेवढा थोडाच होणार आहे. विदर्भा- तील मराठी जनतेतील यामुळे झालेला असंतोष वेळेवरच ध्यानीं घेऊन तेथील सरकार याविषयी योग्य त्या धोरणाचा अवलंब करील अशी आशा आम्ही करितों.

× × ×

गेल्या जानेवारींत युवक साहित्य संमेलन भरल्यानंतर 'कुमार-साहित्य संमेलन' हि फे. २६–२७ ला पुणें येथे श्री. ना. धों. ताम्हनकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. अितकीं वेगवेगळीं संमेलनें भरण्याच्या आवश्यकतेविषयीं शंका असूनहि या संमेलनाचें आम्ही अेका कारणास्तव अभिनंदन करितों. युवकांचें संमेलन झाल्यावर त्याचें पुढील कार्य काय चाललें आहे हें कांही अद्यापि कळलें नाही. कुमार-साहित्य-संमेलनाने मात्र आपला नियाचा म्हणून कार्यक्रम पुणें येथे आणि बाहेर सुद्धा चालू ठेवल्याचें वृत्त कळतें. कुमाराच्या या साहित्य- विषयक चळवळींत साहित्यविषयक ठराविक दृष्टिकोणांचें अुपपादन चालू न ठेवतां सर्वच दृष्टिकोणांचा त्यांना परिचय करून द्यावा हें आवश्यक आहे अेवढेंच सुचवावेसें वाटतें.

× × ×

अनुक्रमणिका

गेल्या मे महिन्यांत मुळींच गाजावाजा न होतां मराठींतील अेक महत्त्वाचा ग्रंथ प्रकाशित झाला. त्याचें नांव **मराठी ग्रंथसूचि** व त्याच्या कर्त्याचें नांव **श्री. शंकर गणेश दाते** असें आहे. अि. स. १८०० पासून १९३७ पर्यंत मराठीमध्ये छापल्या गेलेल्या व अुपलब्ध झालेल्या लहान थोर ग्रंथांची सूचि यामध्ये देण्यात आली आहे. अशा अेकूण १८७६८ पुस्तकांची सूचि ग्रंथाचें नांव, ग्रंथकाराचें नांव, प्रकाशनाचें स्थल आणि त्याचा काल, ग्रंथकाराच्या साहाय्यकाचें नांव, पृष्ठसंख्या व तिचें वर्णन, किंमत आणि ग्रंथांतील विषयाची थोडक्यांत कल्पना अितक्या गोष्टी देअून या ग्रंथांत संपादकाने दिली आहे. मुख्य ग्रंथसूचि मोठ्या रॉयल आकाराचीं १०७२ पानें अेवढी मोठी झाली आहे. या ग्रंथास सूचि म्हणून दुसरा खंड ३७६ पानें अेवढा झालेला आहे. हें अेवढें काम श्री. शं. ग. दाते यानी सर्वस्वीं अेकट्याच्या बळावर केलें ही गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे यापूर्वी श्री. य. रा. दाते यांनी महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि (२८१०-१९१७) पर्यंतची अशी अेक केली होती. त्यानंतर पुढील वीस वर्षांत बराच ग्रंथविस्तार झाला तो सारा या सूचींत आला आहे. सूचीची मांडणीहि अिग्रयावत् नियमांना धरून शास्त्रीय पद्धतीने केली गेली आहे, व सूचीला जोडलेल्या संदर्भकोशाने कोणत्याहि ग्रंथाचा संदर्भ चटकन् सांपडणें शक्य झालेलें आहे. काम संकलन संपादनाचें खरें, पण अेवढें प्रचंड आहे की अेकट्या माणसाने तें अितकें व्यवस्थितपणें सात-आठ वर्षें सतत खपून तडीला नेलें ही गोष्ट अत्यंत कौतुकास्पद वाटते. मराठी वाङ्मयाच्या कोणाहि अभ्यासकास ही सूचि अत्यंतावश्यक असल्याने श्री. दाते यांच्या या कोशग्रंथाने त्यांच्यावर फार अुपकार करून ठेवलेले आहेत. सूचि करतांना स्वतःस आलेल्या अनुभवावर आधारलेली सूचिग्रंथाच्या रचनेची पद्धतहि आरंभींच्या साठ पानांमध्ये त्यांनी दिली आहे. तीवरून पुढील सूचिकारांना मार्गदर्शन होण्याजोगें आहे. ग्रंथसूचिशास्त्रविषयक अिंग्रजीमधील वाङ्मय, तद्विषयक मराठी परिभाषा, दशांशवर्गीकरणपद्धतीची माहिती अित्यादि गोष्टींमुळे या ग्रंथाच्या अुपयुक्ततेंत भरच पडली आहे. स्वतः दाते हे अत्यंत प्रसिद्धिपराङ्मुख असल्याने त्यांच्या या कार्याचें महत्त्व लोकांच्या दृष्टीपुढे यावें तसें आलें नाही. तथापि महाराष्ट्रीय जनतेने त्यांच्या या ग्रंथाचें सक्रिय असें चीज करणें आवश्यक आहे. मराठी वाङ्मयाची अभिमानास्पद कोशपरंपरा श्री. दाते यांच्या या ग्रंथाने अधिकच अुज्ज्वल झाली आहे यांत मुळींच शंका नाही.

× × ×

ग्वाल्हेरचे प्रा. प्र. वा. बापट, अेम्. अे., बी.टी. यांच्या अकाली निधनाने बृहन्-महाराष्ट्राच्या सीमाप्रान्तामधील मराठीच्या अध्ययनाध्यापनाची ज्योत जागती ठेवणारा अेक वाङ्मयसेवक नाहीसा झाला हें नमूद करण्यास खेद वाटतो. 'मराठी कादंबरी, तंत्र आणि विकास', 'मराठी आख्यानककविता' हीं त्यांच्या वाङ्मयसेवेचीं स्मारकें त्यांच्या मराठीविषयक अभ्यासाची कल्पना ओझरतींच देतात. त्यांचें नामदेव कबीरविषयीचें काम, किंवा 'वाङ्मयाच्या पाअूलवाटा' म्हणून साहित्याच्या निरनिराळ्या प्रकारांच्या तंत्राविषयीचें लेखन अपूर्ण अप्रकाशित स्थितींतच राहिलें आहे. मराठी वाङ्मयाच्या वाचन मननाने पक्क झालेले त्यांचे विचार ग्रंथनिविष्ट होण्याच्या आंतच त्यांचा अंत व्हावा ही गोष्ट शोचनीय आहे.

---

# साभार-स्वीकार

१ व्याधाची चांदणी— लें० प्रभाकर पाध्ये; प्रका० कृ. ना. सावळे, रामकृष्ण प्रकाशन मंडळ, त्रिभुवन रोड, मुंबआी ४; मूल्य रु.२॥.

२ बाल विज्ञान संयोग पु. ४ थें— लें० द. व्यं. पै; प्रका० के. अेच्. सहस्रबुद्धे, श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर; मूल्य रु.१ आ.२.

३ सोलापूरच्या कामगार— प्रका० कॉ. सिद्रामप्पा फलमारी, लाल बावटा गिरणी कामगार युनियन, ५७ नवी पेठ, सोलापूर; मूल्य आ. ३.

४ समाजांतील भोळया समजुती; मेंदू आणि मन— लें० व प्रका० द. ल. सहस्रबुद्धे, डेक्कन जिमखाना कॉलनी, पुणें ४; मूल्य रु. २॥.

५ बहुजनसमाजांतील कर्मवीर— लें० द. रा. दरेकर; प्रका० सौ. कमलाबाआी द. दरेकर, २३१ वेताळ, पुणें २; मूल्य रु ३.

६ सौभद्र (अिंग्रजी)— भाषान्तरकार अेस्. वी. तळेकर; प्रका० गोडबोले, ६२१ बुधवार, पुणें २; मूल्य रु. ५.

७ सुमनहार— प्रका० शं. श्री. देव, चिटणीस, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें; मूल्य रु.१।.

८ आजोबांच्या मुली— लें० माधव मनोहर; प्रका० नवभारत प्रकाशन संस्था, मुंबआी; मूल्य आणे ५.

९ देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण परिचयग्रंथ— लें० विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव; प्रका० वि. के. खासनीस, दे. ऋ. ब्रा. शि. संस्था, ५२४ बुधवार, पुणें २; मूल्य रु. २.

१० मुंबआी प्रांतांतील अन्नाचा प्रश्न— लें० बी. टी. रणदिवे, लोकप्रकाशन, राजभवन, सँढर्स्ट रोड, मुंबआी; मूल्य आणे १०.

११ An Attack on the Indian Rupee— Published for the Goa Congress Committee by Peter J. Alvers Duart's Oart, Vithalbhai Patel Road, Bombay 4; Price As.4.

१२ हिंदु कायद्यांत स्त्रियांचें स्थान— लें० व प्रका० के. बा. गजेंद्रगडकर, वकील, सातारा; मूल्य रु.१ आणे २.

१३ मोचनगड नामक कल्पित गोष्ट (तिसरी आवृत्ति)— लें० कै. रा. भि. गुंजीकर; मु० व प्रका० रामचंद्र काशीनाथ तटणीस, मुंबआी २; मूल्य रु. १॥.

१४ हिरवे कंदील— लें० अनंत काणेकर; प्रका० स्कूल अँण्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु.२॥.

१५ माझ्या कांहीं नाट्यस्मृति— लें० पु. गो. काणेकर; मु० व प्रका० रा. का. तटणीस, श्रीलक्ष्मीनारायण प्रेस, ३६४ ठाकूरद्वार, मुंबआी; मूल्य रु. २.

१६ विक्रमांक २००७, संपा० वासुदेवशरण आग्रवाल; मुद्रक श्रीअपूर्वकृष्ण बसू, इंडियन् प्रेस लिमिटेड, बनारस प्रेस ब्रँच.

१७ विनागर्षी अण्णासाहेब चिरमुले चरित्र व कार्य—लें० वा. ह. खाडिलकर; प्रका० मो. ना. आगाशे, अध्यक्ष, चिरमुले सत्कार समिति, सातारा; मूल्य रु. ५.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

- मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (मानभावअखेर)— ले०— कै. वा. अ. भिडे. मूल्य रु. १. सभासदांस आणे १२. ट. ख. निराळा.
- महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-इतिहास— ले०—प्रा. द. वा. पोतदार. मूल्य रु. ३. सभासदांस रु. १॥. (ट. ख. निराळा.)
- शैक्षणिक मानसशास्त्र— पारिभाषिक शब्दकोश. मूल्य तीन आणे.
- शुद्धलेखनाचे नवे नियम— मूल्य आणे २॥, ट. ख. निराळा.
- महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका (त्रैमासिक) वा. व. रु. ४॥. सभासदांस मोफत.

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्
टिळक रस्ता, पुणें २